






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

ऑक्टोबर ते डिसेंबर २०१३

आई एक
नाव असतं,
घरातल्या घरात
गजबजलेलं
गाव असतं!

सर्वांत असते
तेव्हा
जाणवत नाही
आता नसली
कुठंच
तरीही
नाही म्हणवत नाही....

...आई असतो
एक धागा
वातीला उजेड दावणारी
समईतली जागा...

...आई एक
नाव असतं
नसते तेव्हा
घरातल्या घरात
गल्बललेलं
गाव असतं!

अनुक्रमणिका

# म. सा. पत्रिका - शताब्दीपूर्ती समारंभ






**१० ऑक्टोबर २०१३**

ज्येष्ठ समीक्षक आणि ८३व्या अ.भा.मराठी साहित्यस[illegible]लनाध्यक्ष डॉ. द. भि. कुलकर्णी शताब्दी अंकाची समीक्षा करता[illegible]



माजी खासदार, मुळा सह-साखर कारखान्याचे अध्यक्ष- मा. यशवंतराव गडाख-पाटील म.सा.पत्रिकेतील उत्कृष्ट समीक्षालेखास पारितोषिक देण्यासाठी रु. एक लक्ष मात्र देणगीचा धनादेश संपादक डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्याकडे देताना




(डावीकडून) कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर, कार्यवाह नंदा सुर्वे, का. सदस्य डॉ. किसन पाटील, संपादक डॉ. सु. प्र. कुल[illegible] म. सा. प. अध्यक्ष डॉ. प्र. चिं शेजवलकर, समारंभाध्यक्ष डॉ. द. भि. कुलकर्णी, उद्घाटक मा. यशवंतराव गडाख-पाटी[illegible] मसाप विश्वस्त मंडळ अध्यक्ष अॅड. भास्करराव आव्हाड, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, का. सदस्य डॉ. अरविंद संगमने[illegible] का. सदस्य प्रभाकर संत. (मागील बाजूस उभे) उद्धव कानडे, कार्यवाह दीपक करंदीकर, का. सदस्य मेधा काळे, कार्यवाह अॅड. जे. जे कुलकर्णी, का. सदस्य राजन लाखे

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

अंक क्र. ३४६, ऑक्टोबर ते डिसेंबर २०१३

संपादक

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**



प्रकाशक

**प्रकाशक पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

दूरभाष ०२०-२४४७५९६३

(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**स्मिता टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

मुखपृष्ठ छायाचित्रकार : **दत्ता खोजे, अहमदनगर**
भ्रमणभाष : ९८५०००४०७२
मुखपृष्ठ सजावटकार : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर, २०१३

संपादकीय

# काव्य आणि काव्यमुद्रा!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

शब्द हे काव्याचेच काय, सर्व वाङ्मयाचे शरीर आहे. छंद आणि अलंकाराच्या रूपाने काव्य प्रकटते, अंत:करणाला भिडते. हे सर्व काव्यशरीराविषयी झाले! पण कवितेला चेहरा-मोहरा आहे कां? की नुसतेच अंत:करण? ते कसे दिसावे? कुठे पहावे? 'भावार्थदीपिका' लोकांसाठी लिहिली गेली. ज्ञानानंद लोकांच्याच शब्दात लिहिल्यावर तो लोकांना समजला. ज्ञानदेवांच्या संजीवन-समाधीचा चेहरा लाखो वारकऱ्यांच्या चेहऱ्यावर आजही दिसतो. तो 'अमृतानुभव' शब्दात पकडण्यासाठी ज्ञानदेवांनी स्वतंत्र ग्रंथ लिहिला. पण हे करीत असताना सहस्रावधींच्या चेहऱ्यावर तो दिसतो; हे पाहण्याचे भाग्यही ज्ञानदेवांना लाभले! चिपळ्या एकतारीच्या नादब्रह्मातील अभंगमुद्रा तुकोबाने एकदा उमटविली; तीही काव्यमुद्राच 'ज्ञानबा-तुकाराम'च्या जयघोषाने अजरामर झाली! यशस्वी कवितेला अशी सार्वत्रिक काव्यमुद्रा लाभते. चेहरा लाभतो! तो मोहरा सर्वसमावेशक असतो. तीच कवितेच्या राज्याची मुद्रा! काव्यमुद्रा!

दृश्य आणि श्राव्य असे वाङ्मयाचे दोनच प्रकार छापखाना येण्यापूर्वीचे होते. संस्कृत नाटकालाही दृक्श्राव्य काव्यच म्हणत होते. त्या काव्याचे प्रयोगशास्त्र विकसित झाले नव्हते. संस्कृत काव्यनाटककाराची जशी नावे अजरामर झाली तशी नटांची नावे – कदाचित असतील तरी – विस्मृतीत गेलेली आहेत. के. ना. काळे यांनी नाट्यसाहित्याचा परामर्श घेताना यापुढे असे म्हटले आहे की, काहीवेळा दृश्यकाव्य आणि श्राव्यकाव्य यांना जोडणारा दुवा म्हणजे नाट्यप्रयोग करणाऱ्या नटाच्या अतिउत्साहाने सादरीकरण करताना त्यातील काव्यात्मक नाट्याला मारक ठरत असे. नट हा तिसरा घटक. परंतु काहीवेळा कवी आणि त्याचे लेखनपाठ यातील अंतर नष्ट करून, उत्कट संयमित अभिनयातून काव्यानुभव देण्यात, नट कमी पडण्याची शक्यता होती. नाट्यलेखन आणि नाट्यप्रयोग यात अंतर कमी पडले (Underacting) किंवा जास्त झाले (Overacting) तर रसहानि होत असे. काही वेळा संहितेत (नाट्यकाव्यात) नसलेल्या गोष्टी दाखवायचा मोह नटाला होतो. आता तर दिग्दर्शक हा आणखी एक घटक, नटाला मार्गदर्शक सूचना देताना मूळ संहितेचा घात करण्याची शक्यता असते. कविता सादर करण्याच्या बाबतीत या चर्चेचा विचार करणे आवश्यक ठरते. कवितेचे अभिवाचन ही एक कलाच आहे.

अहमदनगरच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष मा. यशवंतराव गडाख-पाटील आणि कार्याध्यक्ष या नात्याने मी, तसेच अन्य सहकारी संमेलनाचे निमंत्रण देण्यासाठी पु.ल.देशपांडे यांच्याकडे गेलो होतो. त्यावेळी मुलांसाठी शाळा आणि महाविद्यालयीन स्तरावर 'कविता अभिवाचनाची' स्पर्धा आयोजित करावी, अशी सूचना त्यांनी केली. 'कवितेचे अभिवाचन ही पाठांतर आणि सादरीकरण अशी संयुक्त प्रक्रिया तर आहेच; परंतु त्याहीपलीकडचे 'निरूक्त' व्यक्त करणारी ती कला आहे' असे त्यांनी स्पष्ट केले होते. त्याचा अधिक विचार करताना असेही जाणवले की, कवीचे मन आणि शब्द याचे नाते शंभर टक्के कधीच जमत नाही. काहीतरी राहिल्याची हुरहुर असतेच. ते जे 'काहीतरी' निरूक्त (नि:+उक्त = न बोललेले) असते; तो अवकाश भरून काढण्याची कला कवितेच्या

अभिवाचनात अपेक्षित असते. कवितेचे सादरीकरण, ही गायनाच्याही पलीकडची अनवट वाटेने जाणारी कला आहे. कवि गुलजार यांना त्यांच्या 'जय हो...!' ह्या गीतलेखनास मिळालेल्या 'ऑस्कर' पुरस्काराबद्दल प्रतिक्रिया देताना म्हटले; 'सर्व श्रेय संगीतकार रहमानचे आहे. माझे केवळ शब्द आहेत. स्वर रहमानचे आहेत. त्याच्या स्वरांनी माझे शब्द जागे केले...!' ह्यात गुलजारांच्या नम्रपणाबरोबर त्यांनी सादरीकरणाला दिलेले महत्त्व मला महत्त्वाचे वाटते. ह्याची जाण असलेल्या कवीचे सादरीकरण तर जातिवंत कलाच!

कवीच्याच मुखातून ती ऐकण्याचा आनंद वेगळाच असतो. म्हणूनच जाड्याभरड्या आवाजात कवी यशवंत जेव्हा त्यांची 'स्वामी तिन्ही जगाचा । आईविना भिकारी' म्हणत; तेव्हा ती आर्तता साक्षात होत असे. कवी सुरेश भट तर आपल्या कविता गाताना शब्दांचे हालहाल करीत गात असत. तरीही 'देखावे बघण्याचे... वय निघूऽन गेले...' या व अशा कवितेचे आणि अन्य अनेक गजलांचे सादरीकरण ऐकण्यासाठी रंगमंदिर हाऊसफुल्ल होत असे. वसंत बापट, 'विंदा', मंगेश पाडगावकर, बा. भ. बोरकर, ना. धों. महानोर, नारायण सुर्वे, इत्यादींच्या कविता-अभिवाचनाच्या प्रयोगांनी जी 'काव्यमुद्रा' उमटविली, ती रसिकांच्या मनावर आजही अधिराज्य गाजवते आहे. कवी आणि कविता यांच्यात तिसरा घटक नसण्याने ही काव्यमुद्रा अमर झाली!

देशात आणि देशाबाहेरही कविता अभिवाचनाची मैफल रंगविणारे, तसेच विरुपिकेच्या आणि भाष्यकाव्याच्या प्रभावी माध्यमात रसिकांना हसवीत अंतर्मुख करणारे, **काव्यअभिवाचनाचे नवप्रवर्तक कवि रामदास फुटाणे** यांनी अभिवाचनाचे हजारो प्रयोग केले. आपल्याबरोबर अनेक नवख्या कवींनाही प्रकाशात आणले. कविता अभिवाचनाचे युगच निर्माण केले. याचा उल्लेख केलाच पाहिजे.

कविता अभिवाचनाने रसिकांना मंत्रमुग्ध करण्यात अग्रेसर असलेले **कवी फ.मु.शिंदे** यांना आता आचार्य अत्र्यांच्या भूमीत – सासवडला होत असलेल्या ८७ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष पदावर रसिकांनी विराजमान केले आहे. सत्तावीस नक्षत्रांसारखे त्यांचे सत्तावीस काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. ते लाखमोलाचे तर आहेतच! परंतु एक 'आई' कविता लिहून ते साहित्य संमेलनाच्या निवडणुकीला उभे राहिले असते; आणि 'आई'चे अभिवाचन करण्यातच प्रचारदौरे काढले असते; तरी पुरे होते. विशेष म्हणजे 'फ.मुं.'च्या या विजयाने त्यांचे प्रतिस्पर्धीही दुखावलेले नाहीत!

'आई' हा काव्यविषय सर्वांची मने जुळून येणारा आहे. कवी यशवंत, कवी माधव ज्युलियन यांच्या कवितेनंतर 'फ.मुं.'च्या आई या कवितेने सर्वांच्या मनाचा ठाव घेतला. माधव ज्युलियनांच्या 'आई'ला लतादीदींचा स्वरस्पर्श झाला. त्यामुळे ती मनामनात ठसली; आणि (ओठाओठांवर) गुणगुणत राहिली. कवी माधव ज्युलियन आणि कर्मठ विचारांचे त्यांचे आई-वडील, यांच्यात मोठी वैचारिक दरी होती. माधवरावांच्या प्रेमकाव्याला चटोर काव्य म्हणून, असला अनीतिमान पुत्र घरात राहणे त्यांना मान्य नव्हते. घराबाहेर पडलेल्या माधवरावांनी आईचे प्रेम गमावले होते. याचे दुःख तर या कवितेमागे नसेल? नंतर माधवराव कॅन्सरच्या आजाराने अंथरुणावर खिळले. त्यावेळी मनातील सर्व राग सोडून आईने त्यांची सेवा केली. त्या मनाच्या अवस्थेत माधव ज्युलियनांनी 'आई'वर आणखी एक कविता लिहिली आहे; ती रसिकांपर्यंत पोहोचली नाही. कारण रविकिरण मंडळाचे कविता-अभिवाचनाचे कार्यक्रम त्यावेळी थांबलेले होते.

कवीच्या मुखातून म्हणजेच अंतःकरणातून कविता अभिवाचन ऐकणे आणि सादरीकरण होत असताना कवीच्या भावमुद्रा पाहणे. हा एक अलौकिक असा भावप्रवास आहे. त्यातून 'आई' हा विषय मनाला कायमची हुरहुर लावणारा! आद्य शंकराचार्यही या



अनुक्रमणिका

भावनेतून सुटले नाहीत. शैशवावस्थेतच मातेची आज्ञा घेऊन संन्यासी झाल्यामुळे आईची चरणसेवा घडली नाही. ('जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता ।') चारचौघांसारख्या लौकिक मुलाप्रमाणे पैसे मिळवून आईच्या स्वाधीन करता आले नाहीत. ('न. वा. दत्तं देवी– द्रविणमपि भूयस्तव मया ।') तरीही आईचे अनुपम प्रेम मला लाभले. ('तथापि त्वं स्नेहं मयि निरूपमं– यत्प्रकुरूषे ।') एक वेळ कुपुत्र जन्माला येईल; परंतु कुमाता कधीही जन्माला येत नाही! ('कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ।'). माझ्यासारखा पापी जगात नाही; आणि माझे अपराध पोटात घालणारे आईसारखे दुसरे कुणीही नाही! आचार्य अत्रेंना हेच दु:ख छळत होते. साता समुद्राकडे प्रवास करणारा मी! आईच्या इच्छेप्रमाणे तिला साधे पंढरपूरला नेता आले नाही! 'जी असल्यावर तिची किंमत कळत नाही; आणि नसल्यावर कशाचीच किंमत वाटत नाही.' हे आचार्य अत्रे यांचे उद्‌गार थोड्याफार फरकाने सर्वांचेच आहेत. 'आई समजून घेताना...' उत्तम कांबळे असेच हैराण झाले! अभावग्रस्त जीवनाचे हलाहल पचवलेली आई जमिनीशी नाते विसरली नाही.. त्याच्या कटू शब्दातही मुलाविषयीचे प्रेम-अभिमान मनाच्या तळाशी जिवंत झऱ्यासारखे!

'फमुं'ची आई अशीच मनात घर करणारी आहे. 'फमुं'चे शब्द तिचे अस्तित्व शोधताना सैरावैरा धावताना जाणवतात. 'गजबजलेले गाव'.. आणि 'गल्बललेलं गाव'... दोन्हीही जीवघेणेच! तिला आपण समजून घेतले नाहीच शेवटपर्यंत...! ही युगायुगांची जखम 'फमुं'नी बोलती व प्रकटही केली आहे. म्हटले तर श्राव्यही आणि दृश्यही आहे. ऐकताना मनाला चिर-परिचित शब्द दृक्-श्राव्यापलीकडच्या 'निरुक्त' भावना जागवीत राहतात. ती जाते तेव्हा असे काहीतरी ठेवून जाते... देऊन जाते... आणि जीवनभराचा प्रवासी ते आठवले की काहीतरी हरवल्याची हुरहूर अखेरपर्यंत उराशी बाळगूनच संपतो! कोणत्याही समीक्षेची लेखणी तिचा परामर्श घेण्यास खुरटी ठरेल!

अभिवाचन करणाऱ्या कवीच्या चेहऱ्यावर मात्र हे भाव दिसतात. ती भावमुद्रा-काव्यमुद्रा सर्व काही सांगून, दाखवून जाते. कवितेवर राज्य करण्याची 'काव्यमुद्रा' 'फमुं'ना लाभली आहे. म्हणूनच हे दृश्य आणि श्राव्यकाव्य पाहण्यासाठी आणि अनुभवण्यासाठी हजारो रसिक आसुसलेलेच राहतील! त्यासाठी कधीही, कुठेही धावत येतील!

---

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

सु. कुलकर्णी

संपादक
महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९

## निवेदन

डिसेंबर २०१३ च्या अंकात पत्रिकेला लाभलेल्या संपादकांची नावे आणि कालखंड, पा.नं. १३ वर दिलेली आहेत. ती म.सा.पत्रिका सूचिमधील पा.नं. २३१ वरील उल्लेखाप्रमाणे पुनर्मुद्रित केली. त्यात एप्रिल १९६१ ते १९६३ काळातील संपादक **मा. दि. के. बेडेकर** यांचा समावेश करणे आवश्यक आहे. सदर चुकीची दुरुस्ती करून वाचावे, ही विनंती. (त्याअगोदर वा. रा. ढवळे १९५५ ते मार्च १९६१ होते.)



अनुक्रमणिका








# कविवर्य - साहित्यिक फ. मुं. शिंदे यांची साहित्यसंपदा

**(८७ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, सासवड २०१४ चे नियोजित अध्यक्ष)**



- **नाव :** फकीरराव मुंजाजी शिंदे : 'फ. मुं.'
- **जन्म :** १२ ऑगस्ट १९४८
- **जन्मगाव :** मु.रूपूर पो. नांदापूर, ता. कळमनुरी, जि. हिंगोली (मराठवाडा)
- **शिक्षण :** एम. ए. (मराठी भाषा आणि वाङ्मय) १९७२ : प्रथम श्रेणीत सर्वप्रथम.
- **व्यवसाय :** १९७२ ते २००२ मराठीचे अध्यापन, पदवी आणि पदव्युत्तर वर्ग. देवगिरी महाविद्यालय, औरंगाबाद
- **विद्यमान अध्यक्ष :** रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, महाराष्ट्र शासन, मुंबई. २००० ते आजतागायत : गेली १३ वर्षे
- **प्रकाशित साहित्य :** २७ कवितासंग्रह । ३ समीक्षासंग्रह । राजकीय उपहासिकासंग्रह । विचारशील विनोदपर गद्यसंग्रह । बुद्धजीवनाच्या एकांकिकांचा संग्रह । रतनलाल सोनग्रा यांच्या 'क्रांतिबा फुले' या हिंदी नाटकाचा मराठी अनुवाद.
- **महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार :**

**अ) उत्कृष्ट वाङ्मनिर्मितीचे महाराष्ट्र शासनाचे वाङ्मय पुरस्कार**

१. उत्कृष्ट काव्यलेखनासाठी सतत तीन वेळा कवी केशवसुत पुरस्कार
२. समीक्षालेखनासाठी विशेष पुरस्कार
३. विनोदपर लेखनासाठी अत्रे-कोल्हटकर पुरस्कार
४. एकांकिका लेखनासाठी पुरस्कार

**ब) इतर संस्थांचे वाङ्मय पुरस्कार**

१. पुणे मसापचा कवी यशवंत पुरस्कार
२. पुणे मसापचा कवी भा.रा.तांबे पुरस्कार
३. सोलापूरचा दमाणी पुरस्कार
४. मुंबईचा नानक रुपानींचा प्रियदर्शनी साहित्य पुरस्कार
५. राष्ट्रीय बहुजन विकास महासंघाचा साहित्यरत्न अण्णा भाऊ साठे पुरस्कार
६. नांदेडचा प्रसाद बन साहित्य पुरस्कार
७. जालन्याचा हरिश्चंद्रराय दु:खी पुरस्कार
८. लोणीचा पद्मश्री विखे पाटील पुरस्कार
९. कळमनुरीचा स्वा. सै. कोंडबाराव जरोडेकर
१०. सेलूचा स्वा. सै. चारठाणकर साहित्य गौरव पुरस्कार
११. गदिमा काव्यप्रतिभा पुरस्कार, पुणे

**क) महाराष्ट्र शासनाचा :** डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलितमित्र पुरस्कार

- **इतर मानसन्मान :**

**अ) अन्य साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद**

१. मसापचे मराठवाडा साहित्य संमेलन, मुरुड
२. महाराष्ट्र राज्य कामगार साहित्य संमेलन, नांदेड
३. अस्मितादर्श साहित्य संमेलन, अमरावती
४. परभणी जिल्हा साहित्य संमेलन, सोनपेठ
५. दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन, कुंभारगाव
६. नरहर कुरुंदकर स्मृती साहित्य संमेलन, नांदेड
७. आंबेडकरी साहित्य संमेलन, पुलगाव
८. परिवर्तन साहित्य संमेलन, अहमदपूर
९. मराठी साहित्य संमेलन निपाणी (बेळगाव)
१०. शेकोटी साहित्य संमेलन, पणजी-गोवा
११. अत्रे साहित्य संमेलन, सासवड
१२. महाराष्ट्र युवक साहित्य संमेलन, नाशिक
१३. ग्रामीण मराठी साहित्य संमेलन, विटा
१४. मराठवाडा कामगार साहित्य संमेलन, औरंगाबाद
१५. साहित्यिक कलावंत संमेलन, पुणे
१६. वारणेचा वाघ साहित्य संमेलन, कोडोली



अनुक्रमणिका

२०. राज्यस्तरीय शिक्षक साहित्य संमेलन, तुळजापूर
१७. ग्रामीण मराठी साहित्य संमेलन, अहमद लाट
१८. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विचार साहित्य संमेलन, राळेगाव
२०. राज्यस्तरीय शिक्षक साहित्य संमेलन, तुळजापूर
१९. राज्यस्तरीय शव्दगंध साहित्य संमेलन अहमदनगर
२०. राज्यस्तरीय शिक्षक साहित्य संमेलन, तुळजापूर
२१. सीमावर्ती मराठी साहित्य संमेलन, कोवाड

**ब) प्रकट मुलाखत :**

१. अ. भा. मराठी साहित्य संमेलन, चंद्रपूर
२. प्रबोधनकार ठाकरे विचार साहित्य संमेलन, पुणे

**क) कविसंमेलनांचे अध्यक्षपद**

१. अ. भा. मराठी साहित्य संमेलनातील मुख्य काव्यसंमेलनाचे दोन वेळा अध्यक्ष
२. अ. भा. मराठी साहित्य संमेलनातील नवोदितांच्या काव्यसंमेलनाचे तीन वेळा अध्यक्ष
३. अ. भा. त्रैमाषिक (मराठी, उर्दू, हिंदी) संमेलनातील मराठी काव्य संमेलनाचे अध्यक्ष
४. प्रजासत्ताक दिनाच्या राष्ट्रीय कविसंमेलनात मराठीचे प्रतिनिधित्व, दिल्ली
५. साहित्य अकादमी आयोजित काव्यवाचनाचा स्वतंत्र कार्यक्रम, मुंबई

**ड) माजी सदस्य**

१. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
२. महाराष्ट्र राज्य कला परिषद
३. आकाशवाणी कार्यक्रम सल्लागार समिती
४. शिवाजी विद्यापीठ मराठी अभ्यास मंडळ
५. डॉ. बाबासाहेब आंवेडकर मराठवाडा विद्यापीठ मराठी अभ्यास मंडळ
६. पश्चिम विभाग सांस्कृतिक केंद्र, उदयपूर

**इ) महाराष्ट्र शासनाच्या उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती पुरस्कार** समितीचा अध्यक्ष म्हणून सलग तीन वेळा नियुक्ती

**ई) अभ्यासक्रमात साहित्याचा समावेश**

१. डॉ. बाबासाहेव आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ
२. शिवाजी विद्यापीठ
३. कर्नाटक विद्यापीठ
४. संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ
५. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ यांच्या पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमात कवितांचा व कवितासंग्रहांचा समावेश.
६. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मराठी अभ्यासक्रमात 'सूर्यमुद्रा' काव्यसंग्रहाचा समावेश.
७. डॉ. बाबासाहेव आंवेडकर मराठवाडा विद्यापीठ आणि स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ : 'विद्यापीठ गीतलेखन'

- **गीतलेखन :** १. नऊ मराठी चित्रपट २. मालिका शीर्षकगीत ३. भावगीते, लोकगीते, भक्तिगीते : ध्वनिफिती आणि ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध
- **व्ही.सी.डी. :** 'राज्य म्हणे जनतेचे'

## 'डाकीण' अंधश्रद्धेवरील कादंबरी - 'चकवा' – प्रा. डॉ. फुला बागुल

*[ माणसाच्या मनाने जसा देव निर्माण केला तसा दैत्यही! परंतु मानवी मनाच्या विकृतीतून 'हडळ', 'डाकीण', जखीण, समंध, ब्रह्मसमंध अशा अमानवी प्रवृत्तीच्या जातीही निर्माण केल्या. ह्या मनोविकृतीच्या भोवऱ्यात अनेक निष्पाप व्यक्तींचा बळी जातो. 'डाकीण' ही कादंबरी– अशा मनोविकृतीतून निर्माण झालेल्या अंधश्रद्धेचा गैरफायदा घेणाऱ्या एका खलप्रवृत्तीच्या व्यक्तीभोवती गुंफली आहे. शेक्सपियरच्या 'इयागो'चा हा एक नवा आविष्कार आहे. या निमित्ताने आदिवासी अंधश्रद्धेचा मागोवा घेता-घेता, 'डाकीण' एक सामाजिक प्रश्न उभा करण्यात यशस्वी झाली आहे. हेच याचे यश मानावे लागेल. डॉ. नरेन्द्र दाभोळकरांना हीच श्रद्धांजलीही! –संपादक]*

**प्रास्ताविक :**

'चकवा' ही डाकीण प्रथेची मूळं शोधून वैज्ञानिक दृष्टी रुजविणारी, डॉ. अलका कुलकर्णी लिखित, साधना प्रकाशनाने प्रकाशित केलेली कादंबरी आहे. नंदुरबार हा महाराष्ट्रातील आदिवासी बहुल जिल्हा आहे. या जिल्ह्यातील आदिवासींमध्ये एखाद्या स्त्रीला जाणीवपूर्वक डाकीण ठरवले जाण्याची अंधश्रद्धामूलक रूढी परंपरेने चालत आली आहे. कुठल्याही आपत्तीस अशी स्त्रीच जबाबदार असते; या गैरसमजुतीतून अशा डाकीण मानल्या गेलेल्या स्त्रीचे उर्वरित आयुष्य हालाखीचे होते. अशा या कुप्रथेवर पहिल्यांदाच प्रकाश टाकणाऱ्या या कादंबरीची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे विशद करता येतील.

**कथानक :**

'चकवा' ही हरणखुरी, ता. शहादा, जि. नंदुरबार या सातपुड्याच्या पायथ्याशी असलेल्या आदिवासी पाड्यात राहाणाऱ्या 'सेवली' या डाकीण प्रथेची बळी ठरलेल्या स्त्रीची करुण कहाणी आहे. सायली सुस्वरूप तरुणी आहे.



विवाहापूर्वी शिक्षणाची हौस असूनही आईच्या आजारपणात तिला शाळा सोडावी लागली. 'एमता' या विविध कौशल्ये असणाऱ्या, सज्जन, समंजस तरुणाशी तिचा विवाह होतो. सोनिया ही तिची मुलगी आहे. गर्भावस्थेत शिडीवरून पडल्यामुळे तिचा गर्भपात होतो. अतिरक्तस्रावामुळे दवाखान्यात भरती होण्यासाठी तिला दागिने विकावे लागतात. मुलगा व्हावा, ही तिची अपेक्षा यावेळीही भंगते. यातून तिच्या अशुभ पायगुणाची चर्चा पाड्यात सुरू होते. हे तिला वेस्ताबाय कडून कळते. ती दुःखी होते. 'पेसऱ्या' हा या कादंबरीतला खलप्रवृत्तीचा इसम तिच्या नवऱ्याला गुटख्याचे व्यसन, दारूचे व्यसन लावतो. पाड्यातल्याच वंताबायचा नातू मरतो. गर्भावस्थेतल्या कुपोषणामुळे तो मरतो. तरी पेसऱ्या इंदूरकडच्या भगताचा हवाला देऊन कुणाची तरी नजर लागल्याची शंका वंताबायच्या मनात पेरून देतो. स्वार्थी वृत्तीच्या पेसऱ्याची नजर सेवलीच्या शेतावर असते. काही दिवसांनी हरणखुरीच्या पाळीव कोंबड्या अचानक मरतात. वस्तुतः या कोंबड्या 'बर्डफ्ल्यू' या साथीच्या आजाराने मरतात. तरी पेसऱ्या ही

घटना 'डाकण प्रकार' असल्याची वार्ता चोहीकडे करतो. पाड्यातल्याच कुसीबायला 'डाकण' दिसल्याचा प्रकारही घडतो. दरम्यान पंधरा वर्षांत सुरा (मुलगा) नाही, या दुःखाने सेवली आत्ममग्न होते. खिन्न राहते. याचा गैरअर्थ बायाबापड्या घेतात. हरणखुरीच्या शिवारात टोळधाड येते. शेते फस्त होतात. हे सर्व विघ्न गावातल्या डाकीणींमुळे आल्याची कुणकुण गावात होते.

अस्तंभा यात्रेतल्या प्रवासात पेसऱ्या एमताला खोल दरीत ढकलतो. दारूच्या नशेत तो पडला असे पंचांना सांगून पेसऱ्या मोकळा होतो.

गावकोतवालाचा तरुण मुलगा मरतो. वस्तुतः तो असाध्य आजाराने मरतो. पेसऱ्याला ही सेवलीला डाकीण ठरवण्याची संधी वाटते. पूर्वनियोजनाद्वारा तो या सर्व विघ्नांना सेवलीच जबाबदार असल्याची गावकऱ्यांची खात्री पटण्याची व्यवस्था करतो. गावभगताला अगोदर सर्व पढवून ठेवतो.

पेसऱ्या इंदूरकडच्या सुप्रसिद्ध भगताशी संधान साधतो. त्याला सेवलीचे नाव डाकीण म्हणून समोर येईल; अशा सर्व खाणाखुणा सांगून ठेवतो. या भगतासमोर गुढी ठेवल्यावर हा भगत पेसऱ्याने आगाऊ दिलेल्या हजार रुपयास जागून अशा खाणाखुणा सांगतो, ज्या अन्वये सर्वांची सेवली हीच डाकीण असल्याची खात्री होते. संतापाने ते तिला मारायला धावतात. वेस्ताबाय मध्ये पडते. तिच्या समोर येऊन स्वतःचे नुकसान कशाला करून घेता असे वेस्ताबाय म्हणताच; जमाव पळून जातो. सेवलीला वाचवण्याच्या नादात ती डाकीण असल्याचा शिक्काही मारून जाते. सेवली बहिष्कृत केली जाते. तिने कुणाच्याही नजरेस पडू नये; अशी तिला तंबी दिली जाते. तिच्या नरकयातना वाढायला प्रारंभ होतो. एमताच्या मृत्यूनंतर उदरनिर्वाहासाठी दागिने विकून शेती कसायला ती प्रारंभ करते.

पेसऱ्या रात्रीतून सेवलीच्या शेतातील कणसे चोरून नेतो. नर्सिंगचे शिक्षण घेणाऱ्या सेवलीच्या सोनिया या मुलीशी तिच्या मैत्रिणी बोलेनाशा होतात. एमताचे शेत मी विकत घेतल्याचे व ते एमताने दारूच्या नशेपायी, असाध्य आजारावरच्या महागड्या औषधोपचारासाठी आपल्याला रोख ८० हजारांत विकल्याचे पंचांसमक्ष सांगतो. भ्रष्ट अधिकाऱ्यांच्या मदतीने पेसऱ्या सेवलीच्या शेतावर अधिकार दाखवायला लागतो. पंचही त्याची मालकी जाहीर करतात.

सेवलीने गाव सोडून जाण्याची उख्याची मागणी पंच उचलून धरतात. ती जीव तोडून सांगते, पण पंचांचा निर्णय अंतिम असतो.

महानगरी सुखवस्तू स्त्रिया सेवलीची न्यूज वाचून 'सेव्ह द सेवलीज' ही संघटना सामाजिक सेवेच्या कृत्रिम उमाळ्यातून स्थापन करतात.

सेवलीच्या दुःखाची खरी कल्पना नसलेला, प्रसिद्धीची हाव असलेला, अनुप हा प्रतिभा संपलेला लेखक सेवलीची बातमी वाचून तिच्यावर टेबलवर बसून कादंबरी लिहिण्याचा प्रयत्न करतो.

वेस्ताबायच्या मदतीने सेवली पोलीस स्टेशनात जाऊन आपल्यावरची अन्यायाची तक्रार नोंदवते. प्रारंभी पोलीस दुर्लक्ष करतात. त्यांच्यामते डाकीण ठरवण्याचा प्रश्न पंचांनी सोडवावा. शेवटी अमेय या कार्यकर्त्याच्या पुढाकारामुळे 'एफ.आय.आर.' दाखल होताच यंत्रणा खडबडून जागी होते.

चौथ्या दिवशी सेवली हरणखुरी सोडून सोनियाकडे कायमची राहायला जाणार होती; परंतु तत्पूर्वीच पोलिसी चौकशीमुळे अस्वस्थ झालेले लोक तिला मारायला धावून येतात. वेस्ताबाय तिला रानात पळण्यास सांगते. ती जीवाच्या आकांताने जंगलातून जीव मुठीत घेऊन पळत राहाते. दरीतल्या घळीत राहते. कपडे फाटतात, केसांच्या जटा होतात. तशा अवतारात ती कुसीबायला दिसते. कुसीबाय घरी पळत जाते. आपण प्रत्यक्ष डाकीण बघितल्याचे गावकऱ्यांना सांगते. डाकिणीची ही

कल्पना परंपरेने अशी जोपासली जाते. अशीच डाकीण कुसीबाय नंतर नाजोबायला दिसते. चर्चेला उधाण येते. डाकिणीची भीती दूर होण्याऐवजी बळावल्याचे चित्र निर्माण होते.

**संघर्ष :**

'चकवा' कादंबरीतील संघर्ष निष्पाप सेवली विरुद्ध डाकीण प्रथेच्या नावाखाली तिचे शोषण करणाऱ्या स्वार्थी प्रवृत्ती, यांच्यातील संघर्ष आहे. दुसऱ्या अर्थाने हा संघर्ष माणूस विरुद्ध अनिष्ट रूढी-परंपरा या स्वरूपाचा आहे. पेसऱ्या या खलप्रवृत्तीच्या इसमास एमता व सेवलीची शेती हवी आहे. ती मिळविण्याच्या अभिलाषेतून तो एमताला दरीत ढकलून मारतो. दुसऱ्या बाजूला योगायोगाने घडणाऱ्या घटनांना (टोळधाड येणे, कोंबड्या मरणे, कोतवालाचा तरुण मुलगा मरणे) डाकीण म्हणून सेवलीच जबाबदार असल्याची पडद्याआडून तजवीज करतो. त्यात तो यशस्वी होतो. पहिल्या संघर्षात सेवली हरते. दुसरा संघर्ष ग्रामस्थांशी घडतो. तिला डाकीण म्हणून इंदूरकडच्या भगताने सांगितल्यानंतर तिला घराबाहेर पडण्यास, इतरांच्या दृष्टीस पडण्यास, हापशावर पाणी भरण्यास बंदी आणली जाते. त्याचे उल्लंघन केल्यामुळे मार खावा लागतो. ती बहिष्कृत होते. खोपटीत स्वत:ला कोंडून ठेवावे लागते. शेवटी तर पोलिसात तक्रार केल्यामुळे गावकरी कुऱ्हाडी पाजळत तिला ठार मारण्याच्या हेतूने धावून येतात. जीवाच्या आकांताने पळत ती रानातल्या घळीत आश्रयाला जाते.

अंधश्रद्ध ग्रामप्रवृत्तीशी तिचा हा संघर्ष आहे. त्यांच्यामते सर्व प्रकारची विघ्ने डाकीणीमुळेच येतात. ती स्वत:च्या माणसांना खाते. ही अंधश्रद्धा कुणालाही डाकीण ठरवते. तथाकथित भगत, हितसंबंध गुंतलेले ग्रामपातळीवरील पोलीस पाटील, गावकारभारी, बीट अंमलदार, पंच हे सर्व या शोषणाचे भागीदार असतात. परंपरा आणि परंपरेच्या आडून शोषण करणाऱ्या मानवी प्रवृत्ती या दोन्हींशी समांतरपणे होणारा सेवलीचा संघर्ष या कादंबरीला जिवंत, प्रत्ययकारी व व्यामिश्र बनवितो.

कादंबरीत त्रिस्तरीय वातावरणाचा प्रत्यय येतो. डाकीण ठरवलेल्या सेवलीची ही कथा सातपुड्यातल्या आदिवासींच्या पाड्यात हरणखुरी येथे घडलेली कथा आहे. यामुळे साहजिकच ही कादंबरी आदिम जाणिवेच्या, ग्रामीण, कृषिजन्य वातावरणात घडते.

**वास्तव दर्शन :**

कादंबरीच्या प्रारंभी सेवली निवडणुकांबद्दलचे वास्तव प्रकट करते. सरकार आपण निवडतो या एमताच्या विधानावर ती म्हणते - "निवडतोय कुठं? आपण त गुमान गावचा कारभारी सांगल तिथं फुली उमटवतोय नाय का?" (पृ.१५)

कुसीबायच्या बाळाचे काडीसारखे हातपाय, मोठे डोळे, लोंबकळणारी त्वचा ही गर्भावस्थेतील कुपोषणाचे लक्षण हे या कादंबरीतले वास्तव आहे. कुसीबायचे लग्न व बाळंतपण हे वयाच्या १५ व्या वर्षी होणे हे या समूहाचे वास्तव आहे. मुलीचं लग्न राहिलंय, त्याला बराच खर्च येईल म्हणून शस्त्रक्रिया टाळून शारीरिक वेदना सहन करणारा झिप्याभाऊ, हे वास्तव आदिवासींच्या कायमच्या दारिद्र्याचे निदर्शक आहे.

**उपकथानकांची रचना :**

डॉ. कुलकर्णी यांनी या लघुकादंबरीत दोन उपकथानके रचली आहेत. एक म्हणजे झिप्याभाऊच्या मुलीची सोयरिकीची कार्यवाही थांबणे व त्यामागील कारणे आणि दुसरे म्हणजे 'पेज थ्री' कल्चरच्या अनिता मॅडमने प्रसिद्धीच्या हावेने 'सेव द सेवलीज क्लब' स्थापन करणे. या दोन उपकथानकांच्या द्वारे मानवी वृत्ती-प्रवृत्ती अधोरेखित करण्याचा लेखिकेचा उद्देश आहे.

**आदिम लोकजीवनाचे दर्शन :**

सेवलीच्या दु:खद कहाणीच्या माध्यमातून लेखिका डॉ. कुलकर्णी यांनी सेवलीच्या आदिम जाणिवेचा भोवताल चित्रित केला आहे.

'चकवा' या कादंबरीत सेवली याहामोगी मातेला विनंती करते की, या वक्ताला सुरा (मुलगा) दे. आदिवासींचे हे कुलदैवत आहे. अतिथी म्हणून येणाऱ्या शांतराम गुरुजींना थाळीत गुळखोबरं दिलं जातं, राजापाठाचा निर्देश, कौलांवर सागाची पानं, पळसाची पानं, गवताच्या झावऱ्या टाकणं, निवडुंगाच्या फांद्यांपासून दोर तयार करणं, रोगाच्या साथी आल्यावर बुडव्या भगताकडे जाणे, एमताने बुंगवी विणणे, बुंगवीचा वापर लग्नात होणं, नवायच्या पूजेसाठी हळद व मिरची नसलेली दाळ, चवळीचं वरण, भात, कोवळी कणसं हा नैवेद्य बनवणं, गिऱ्हणच्या खांबाची पूजा, पुजाऱ्याला उपवास सोडायला कोंबडीचं मटण, दारू, नव्या धान्याची पूजा, इंदलचा सण हे सर्व निर्देश आदिवासी जात समूहाच्या लोकजीवनावर प्रकाश टाकतात.

बाट्या, बाहूत, टाबलीमाळ, तुडे हे दागिने व झंप्या, गिमल्या, पेसऱ्या, डंपरदादा, वेस्ताबाय, वंजा, उख्या ही व्यक्तिनामे आदिवासी लोकसंस्कृतीचा परिचय देतात. याखेरीज हाहू (सासू), होहरु (सासरा), ववडी (सून), लाडी (बायको) हे नातेवाचक शब्द आणि बोलीतील संवाद याद्वारेही आदिमांच्या लोकजीवनाचा प्रत्यय येतो. घरात सून आणण्यासाठी 'वधूमूल्य' द्यावं लागणं. होळीच्या निमित्ताने भरणारा गुलाल्या बाजार; इंदल बसवण्याचा सण, त्यासाठी बादीच्या धान्याला हळद लावून ते निमंत्रण म्हणून पाठवणं; गावावर संकट आलं की इंदल बसवणं; कदंबाच्या झाडाचं पूजन करणं, इंद्र, कणहर, हुडोवदेव यांच्या प्रतीकरूप अशा तीन फांद्या तोडून त्यांची मिरवणूक काढणे, याखेरीज अस्तंबा यात्रा, भगताला गुढी दाखवणे, मृताच्या देहातून केसांचे पुंजके निघणे म्हणजे डाकीणीचा प्रकार हे सर्व श्रद्धा, अंधश्रद्धेचे संदर्भ आशयाचाच एक भाग म्हणून कादंबरीत येतात. यातून आदिवासींच्या लोकजीवनावर प्रकाश टाकला जातो.

**संवादासाठी बोलींवर संस्काराचा प्रयोग :**

'चकवा' या कादंबरीत संवादाच्या माध्यमातून कथानक पुढे सरकते. येथले निवेदन प्रमाण मराठीत असून, संवाद मात्र बोलीभाषेत आहेत. संवादाची बोली ही खास लेखिका डॉ. कुलकर्णी यांनी विशिष्ट संस्कार करून पेश केली आहे. वस्तुत: शहादा परिसरात 'पावरा' ही बोली बोलली जाते. तिचे बहुधा सर्व वाचकांना आकलन होईलच, असे नसल्याने लेखिकेने पावरा बोलीचे उपयोजन केलेले नाही. मूळ पावरा बोलीवर अहिराणी, मराठवाडी इतर आदिम बोली (मावची समूहाच्या पाडवी, वसावे, वळवी, नाईक यांच्या बोली) यांचे संस्कार केले आहेत. संवादासाठीच्या बोलीवर आकलन सुलभतेच्या हेतूने त्यांनी संस्कार केले आहेत. शिवाय अशा अभिनव प्रयोगात त्या यशस्वीही झाल्या आहेत. विस्तारभयास्तव उदाहरणे देणे टाळतो.

**शब्दयोजना :**

डॉ. कुलकर्णी यांनी पावरा बोलीची प्रकृति दर्शविणाऱ्या शब्दांची जरूर तेथे योजना केली आहे. पावरा बोलीवर शेजारच्या मध्यप्रदेशातल्या हिंदीचा प्रभाव आहे. त्यातून पहनूत घे, बच्ची, पनपला, मतलब धरतात, बीसपचीस दिह, बीमार, आधाकलाक, मालूम, उमर, नींद, गरमी असे शब्द येथल्या संवादासाठीच्या बोलीत असल्याचे 'चकवा' कादंबरीतून दिसते. 'कंटाळा प्रकटला' सारखा नवा पदबंध डॉ. कुलकर्णींनी योजला आहे. कोहल्लू, बुडवुऊ महिना, लोई, कुदरी, सुरा-सुरी, माली, डेगड, बुडवणी दिशा, पाट्यू, बुल्ला रंग, डायला हे खास पावरी बोलीतील शब्द या कादंबरीत येतात. गोंदडी, हावी

या शिव्या आहेत. तर काही वाक्प्रचारही येथे येतात. उदा. काळजाचं पाणी पाणी होणं.

चकवा कादंबरीची निवेदनशैली अलिप्त, तृतीयपुरुषी निवेदनपद्धती आहे.

**रचना वैशिष्ट्य :**

चकवा कादंबरीत Flash Back हे रचनातंत्र आहे. कादंबरीच्या प्रारंभीच जंगलातल्या घळीत प्रतिकूलतेत राहाणाऱ्या सेवलीचे चित्रण आहे. पुढच्या सर्व प्रकरणात सेवलीला गाव, घरदार सोडून जंगलातल्या घळीत राहाण्याची वेळ का येते त्याची कारणमीमांसा करणाऱ्या घटना येतात. डाकीण प्रथेची बीजे उलगडली जातात. कादंबरीच्या शेवटी पुन्हा पहिल्या प्रकरणातील सेवलीच्या जंगलातल्या घळीतल्या वास्तव्याचा उल्लेख येतो. सेवलीवर डाकीणीचा शिक्कामोर्तब होईपर्यंतच्या घटना विशिष्ट क्रमाने घडतात. सुरुवातीला सेवलीचा गर्भपात - केसोबायचा मुलगा मरणे - कोंबड्यांचा मृत्यू - कुसीबाईला डाकीण दिसते - सेवलीच्या आत्ममग्नतेकडे संशयाने पाहिले जाणे - टोळधाड येणे- एमताचा मृत्यू - कोतवालाचा मुलगा मरतो - मृतदेहात केसांचे पुंजके निघणे - इंदूरकडचा भगत डाकीणीच्या सूचक खाणाखुणा सांगतो. त्यातून सेवली हीच डाकीण असल्याची ग्रामस्थांची खात्री होते. ग्रामस्थ सेवलीवर चाल करून येतात. क्रमाक्रमाने एकेक घटना डाकीणीबद्दलचा संशय बळावत नेतात.

'चकवा' या कादंबरीत काही उणिवा राहून गेल्या आहेत. व्यक्तिचित्रणाकडे लेखिकेचे दुर्लक्ष झाल्याचे जाणवते. बोलीवर संस्कार करण्याच्या प्रयत्नात मूळ पावरी बोली अनेक स्थळांवर आपली मूळ प्रकृति सोडत असल्याचे जाणवते. डाकीण ठरवली गेलेली सेवली स्वत:चे निर्दोषकत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न करताना दिसत नाही, ही बाब अनैसर्गिक वाटायला लागते. सेवलीची जमीन हडप करण्याच्या एकमात्र उद्देशाने पेसऱ्या तिला डाकीण ठरवण्याचा प्रयत्न करतो. डाकीण प्रथेमागे वस्तुत: आणखीही इतर उद्देश आहेत; त्याचे प्रतिबिंब दिसून येत नाही.

**समारोप :**

अशारीतीने कुठल्याही अनिष्ट गोष्टीचं खापर दुसऱ्यावर फोडून, स्वत:ची जबाबदारी न स्वीकारण्याची मानवी प्रवृत्ती, पौर्वात्य दैववादाच्या, नशीब अथवा नियतीच्या कल्पनेसमोर गुडघे टेकणारी मानवी प्रवृत्ती, दुसऱ्याच्या ताटातला घास हिसकावण्याच्या स्वार्थापायी सारासार विवेक बाजूला ठेवण्याची मनोविकृती, मानवी मूल्यांच्या ऱ्हासाला कारणीभूत ठरणाऱ्या अनिष्ट व अंधश्रद्धाधिष्ठित रूढींना कवटाळून बसण्याची व त्यापुढील पिढ्यांतही संक्रमित करण्याची मनोवृत्ती उलगडून दाखविणारी ही मनोविश्लेषणपर कादंबरी आहे. समाजविज्ञानाच्या कक्षांची जाणीव करून देणारी, आदिम समूहाच्या लोकजीवनाचे सांस्कृतिक अंगाने दर्शन घडविणारी, डाकीण प्रथेची मूळं रूढी परंपरेत असल्याचे सिद्ध करणारी, वास्तवतेचे धिटाईने चित्रण करणारी आणि एकूणच आदिवासी साहित्यप्रवाहात मैलाचा दगड ठरू शकणारी ही कादंबरी आहे.

❖❖❖

**चकवा (कादंबरी)**
**डॉ. अलका शशांक कुलकर्णी**
डॉ. कुलकर्णी रुग्णालय, डोंगरगाव रोड,
शहादा, जि. नंदुरबार ४२५४०९.
फोन - ०२५६५/२२३५२२
मोबा. (९४२२७५३२४५)
प्रकाशक- डॉ. नरेन्द्र दाभोळकर
साधना प्रकाशन, ९२६ सदाशिव पेठ, पुणे ३०.

**प्रा. डॉ. फुला बागूल**
३२, गणेश कॉलनी,
शिरपूर, जि. धुळे ४२५४०५
मोबा. ९४२०६०५२०८



अनुक्रमणिका

## 'बाळमुठीतील अनवाणी दिवस'
## — डॉ. द. ता. भोसले

– डॉ. राजेंद्र दास

*[ 'बाळमुठीतले दिवस' डॉ. द. ता. भोसले यांचे हे आत्मचरित्रात्मक ललित लेख आहेत. खडतर, विपरीत परिस्थितीतले बालपण हा जीवनातील एक कटू कालखंड त्यांनी आपल्या प्रासादिक शैलीत वाचनीय आणि उद्‌बोधक केला आहे. महाराष्ट्राच्या ग्रामसंस्कृतीची पार्श्वभूमी आणि लेखकाच्या वाट्याला आलेले खडतर जीवन यांचा मेळ घालताना, ललित लेखनाच्या खेळकर-रम्यपणाला बाधा आली नाही. ग्रामजीवनाचे बारकावे टिपताना आलेली स्वाभाविक मिश्कील शैली रंजकताही वाढविते. वाचनसुख देणारे हे ललित लेख ग्रामसंस्कृतीचे न पाहिलेले पैलूही दाखवितात. –संपादक]*

डॉ. द. ता. भोसले हे मराठी साहित्यविश्वामधील एक प्रतिष्ठित नाव आहे. आपल्या जगण्याकडे तटस्थपणाने पाहाण्याची सवय फार कमी लेखकांना असते. स्वप्नरंजनात्मक स्वरूपाने जीवनाकडे पाहावे. उडवतील तेवढे शब्दांचे बुडबुडे उडवावेत; आणि आपल्याबरोबरच वाचकांचीही फसवणूक करावी, असे लेखन करणारे तथाकथित लेखक त्या बुडबुड्यांइतकेच आयुष्य घेऊन आलेले असतात.

डॉ. द.ता. भोसले यांच्या सर्वच लेखनामध्ये जो मनस्वीपणा दृष्टीला पडतो तोच त्यांच्या 'बाळमुठीतले दिवस' या ललितलेखसंग्रहामध्येही दिसतो. स्वत: लेखकानेच मनोगतामध्ये असे स्पष्टपणे नमूद केलेले आहे की, या माझ्या पुस्तकातील ललित लेखांचे स्वरूप द्विपदरी आहे. यातील सात लेख माझ्या गावाला केंद्रस्थानी ठेवून ग्रामजीवनाचे दर्शन घडविणारे असे आहेत. तर उरलेले सात ललितलेख माझ्या गावाने आणि त्याकाळच्या ग्रामसंस्कृतीने आकार दिलेल्या माझ्या भूतकालीन जीवनातल्या अनुभवांचे चित्रण करणारे आहेत. यातून लेखकाची भूमिका स्पष्ट होताना दिसते.

मुळातच ललितलेखन करणे ही फार अवघड अशी गोष्ट असते. ती गोष्टीकडे किंवा कथेकडे जाऊ नये याची खबरदारी तर घ्यावी लागतेच, पण घडलेला प्रसंग किंवा घटना गोष्टीपेक्षाही कमी प्रतीची नसते. अशावेळी कथा आणि दीर्घकथा किंवा तत्सम स्वरूपाचे लेखन यांच्यामधून जी चिंचोळी वाट जाते तीच ललितलेखनाची असते.

मराठी साहित्याला ललितलेखनाची अत्यंत उत्तम आणि सकस परंपरा लाभलेली आहे. ना.ग.गोरे, दुर्गा भागवत, गो. रा. दोडके, मारुती चितमपल्ली, रवींद्र पिंगे, आनंद यादव, भास्कर चंदनशिव ही या परंपरेतील काही ठळक नावे आहेत. डॉ. द. ता. भोसले यांच्या 'बाळमुठीतील दिवस' या ललितलेखन संग्रहाने या परंपरेत मोलाची भर घातली आहे हे सत्य नाकारून चालणार नाही.

दुष्काळी अशा सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर-जवळील भीमा नदीच्या काठचे सरकोली हे डॉ. भोसले यांचे गाव. अखंड देवाचा शेजार लाभलेल्या या गावातील माणसांच्या भौगोलिक, आध्यात्मिक, सांस्कृतिक, सामाजिक, आर्थिक अशा कंगोऱ्यांचे रम्य दर्शन या ललितलेख संग्रहामध्ये आहे.

खेड्यांच्या या देशामध्ये एक काळ असा होता की, इथे भाकरीपेक्षाही भुकेला अधिक महत्त्व होते. माणूस शब्दासाठी जगत होता आणि शब्दासाठी मरण्याचीही त्याची तयारी असे. गाव म्हणून गावाचे जे थोरपण आहे; ते जपण्यासाठी प्रत्येकजण अत्यंत



अनुक्रमणिका

सावध असे. सहसा कुणावर अन्याय करायचा नाही; आणि करणाऱ्याला मोकळे सोडायचे नाही. अशी न्यायप्रियता होती. सुगीला महत्त्व होते. देवाविषयी आत्मीयता होती आणि त्याहीपेक्षा 'मनुष्यपणा' आणि 'भावंडपणा' याविषयी प्रगाढ प्रेम होते. हे लेखन त्याच काळातील आहे. आता देव आहेत. देवळे आहेत. पारही आहेत. पण पारावर बसण्याला माणसं नाहीत. सिमेंटच्या घरांनी त्यांना बंदिस्त करून टाकले आहे. म्हाताऱ्याकोताऱ्यांनी पारावर बसणे, झोपणे हे एकेकाळी वानप्रस्थाश्रमाच्या एका प्रक्रियेचा भाग होता. आता तो अवमान वाटू लागला आहे. माणसांचे-गप्पांचे विषय बदलले. हेच भोसलेसरांच्या या लेखनाचे खरे दुखणे आहे. म्हणूनच मनोगतामध्ये डॉ. भोसले यांनी या सर्व लेखांचे एक समान सूत्र व्यक्त केले आहे. ग्रामीण माणसाची जीवनशैली आणि तिथे नांदणारे आत्मतृप्त जग गेल्या शतकात नांदत होते, याची जाणीव करून देणारे हे लेख आहेत - हे फार खरे आहे.

दारिद्र्याने माणसांच्या गुणाची माती होते. त्यात सतत लहानसहान गोष्टींसाठी खोळंबून बसावे लागते किंवा झगडावे लागते. या लढाईतला अंतिम विजयही भुकेचा किंवा भाकरीचा आलटून पालटून होतो. माणूस नेहमी पराभूतच होतो. पण हे पराभूत होणे तटस्थपणाने पाहाण्याची वृत्त डॉ. भोसले यांच्याकडे असल्याचे या ललितलेखनामध्ये दिसते.

'भूक' मधील नायक म्हणजे केवळ भाकरीसाठी झटझोंब करणारा नाही, तर त्याबरोबरच त्याचा जीवनविषयक दृष्टिकोन तयार करणारा आहे. जगण्यासाठी करावी लागणारी लढाई भीषण होतीच. पण हीच वाट आपल्याला चालावयाची आहे असे एकदा ठरविल्यावर जे जगणे वाट्याला आलेले आहे ते अतिशय मन:पूर्वक जगण्याचे काम नायक करतो. उकिरड्याच्या काठावर अभावितपणे वाढणारे रोपटे जसे झपाट्याने वाढते, तसे माझ्या भूकेचे व्हायचे असे लेखक म्हणतात. घरी अठराविसवे दारिद्र्य, आई-बाप दुसऱ्यांच्या शेतावर अखंडपणे राबणारे. शेतमजूर कुदळ, पाटी, खोरे यांच्या जोडीला खांदा असायचा. राबणारा हा खांदाही कुदळ, पाटी, खोऱ्यासारखाच वाटावा, अशी स्थिती होती. रोज उठून कष्टाच्या गाड्याला जुंपून घ्यायचे. चूल पेटवायची तर हातपाय खोडावे लागत. मग मिळेल ते खात राहायचे. त्यात न मागून मिळालेले घरातले थोरलेपण भाकरीतला मोठा वाटा धाकट्यांनाच दिला पाहिजे हा कुटुंबाला रिवाज. दारिद्र्याचीच फक्त श्रीमंती असल्याने ताटात सगळे पदार्थ वाढून मोकळेपणाने जेवत असलेली आई लेखकाने कधीतरी पाहिली असेल काय? हे प्रश्नचिन्ह मनाला कुरतडत जाते.

भूक ही पुनरुद्‌भवी गोष्ट आहे. आज भागली तरी उद्या ती लागणारच आहे. तिच्या तजविजीमध्येच लेखकाचे बालपण दमून जाते. भाकरीच्या खरपूस वासाचा पाठलाग करीत करीत तारुण्यात कधी पदार्पण केले ते कळतही नाही. गरीबाच्या घरच्या जेवणात असून असून असणार तरी काय? थपा थपा आवाज करीत थापलेल्या भाकरी आणि जर्मनच्या भगोल्यातली आमटी. भाकरी खायला मिळाली की जहागिरी मिळाल्याचा आनंद. गरजा कमी असूनही त्या भागत नसत. ताका सारखी छोटी गोष्टही विनवण्या आणि मिनतवारी करूनच मिळवावी लागे. त्यांच्या मोबदल्यात पुन्हा शरीरश्रमाची कामे करावी लागत.

ही भूक लाचार बनविते. पाहुण्या रावळ्यांची वाट पाहायला लावते. लग्नसमारंभातच पोट भरण्याचा विधी मन:पूर्वक होत असे. बेदऱ्यांच्या घरून मिनतवारीने मिळालेले ताकही सकाळी आणि संध्याकाळी पुरवावे लागायचे. लक्ष्मण जाधवाकडे ताक मागायला गेल्यावर त्याने तासभर थांबवून ठेवायचे. भूक माणसाला काय काय करायला लावते याचा अनुभव 'भूक' या

ललितलेखातून अनुभवायला मिळतो. श्रीमंत समजली जाणारी माणसं मनानं कशी दरिद्री असतात, याचा प्रत्यय या लेखात येतो.

कष्टाची तयारी असूनही कधी कधी रात्रंदिवस पडणारा पाऊस वैरी बनून या भुकेच्या आड येतो. कुणीतरी या गारव्याने अभावाने आजारी पडते. मग पुन्हा उधार उसनवारी. पुन्हा लाचारी. मग रात्री शिळी राहिलेली भाकरी सकाळी चहाबरोबर खाण्याची अजब रीत, त्याला लेखकाने 'साहेबी बेत' असे म्हटले आहे. तो पार पडत असे.

शेवटी भुकेची आग शमवायला अनेक युक्त्या वापराव्या लागत. त्या सगळ्या प्राण्यांच्या पातळीवरच्या असत. पाहुण्याच्या बैलगाडीमधील वैरणीच्या मकेतली मऊ कणसेही खावी लागत. कोवळे दाणे तर फस्त करीतच. पण त्याची कोवळी बुरकुंडेही खावी लागत. दारिद्र्याने माणसाला खूप काही शिकविलेले असते हे मात्र खरे! इथे मान-अपमान काही नसे. सुगीच्या दिवसात आईच्या अपुऱ्या भाकरीच्या जोडीस तिच्या जोडीदारणी मदत करीत. गोपाळकाल्याचे रूप त्या दुपारच्या जेवणात येई. कडक झालेल्या भाकरीच्या तुकड्याचे ओले करून केलेले तुकडे खरपूस भाजून खायचे. पुढच्या आयुष्यात अनेक चवीचे, खमंग पदार्थ रिचविलेल्या लेखकाला या कडक भाकरीच्या तुकड्याची सतत आठवण येत राहाते. प्रत्येक दिवस साजरा करण्याचे कसब गरीबीच माणसाला शिकविते हे द.ता.भोसले यांनी 'भूक' मध्ये दाखवून दिलेले आहे. ही भूक माणूस आणि जनावर यांच्यातील अंतर कमी करते व कधी कधी तर दोघांनाही एकाच दावणीला बांधून टाकते; आणि असहाय्य करते.

त्यात जर दुष्काळ पडला तर मग विचारूच नका. न खाल्लेले पदार्थ सापडतच नाहीत. बारकी गाजरे शेवग्याचा पाला, भोपळ्याची पाने, ज्वारीचा कोंडा, कच्ची उंबरे काय वाट्टेल ते खाल्ले. कारण जिवंत राहायचे होते. कौतुक याचेच आहे की हे असे कधीही न मिळणारे पदार्थ खाताना लेखकाला कधीही वाईट वाटले नाही. जे जे मिळेल ते खाल्ले. मन आनंदी ठेवले. कारण दुसऱ्या दिवशी कष्ट करायला शरीर तयार ठेवायला हवे होते. शेजाऱ्याच्या घरातल्या खमंग पदार्थांचे वास हवेबरोबर येत आणि मग मन उद्‌विग्न होत असे.

शिकण्यासाठी गाव सोडल्यावरही या भुकेने तिचा जीवघेणा पाठलाग सोडला नाही. वसतिगृहही असेच मोडकळीस आलेले. गिरणीत खाली सांडलेले पीठच पुढे आधार झाले. (यात पानाचे देठ, विड्याची जळकी थोटके. जळालेल्या काड्या, तंबाखू, वाळलेला चुना, शेंगांची टरफले असला सारा मसाला त्यात असे. अशा पिठाची भाकरी अन् किडक्या दाण्यांची, भेसळीच्या तिखटाची पाणीच पाणी घालून केलेली आमटी हेच काय त्या, शिकणाऱ्या लेखकाचे अन्न. त्यावर भरणपोषण तर कसे होणार? लेखकाने लिहिले आहे 'अक्षरश: डोळ्यांतील दु:खाश्रू समोरच्या माझ्या ताटात पडायचे; आणि तेच मी आमटीबरोबर पिऊनही टाकत असे.''

भर तारुण्यात ही उपासमार सहन केलेल्या लेखकाला इतक्या विनोदबुद्धीने स्वत:च्या भूतकाळाकडे पाहाता येते हीच एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. पुढे दिवस बदलले. खायच्या दिवसात खायला मिळाले नाही; म्हणून आता परिस्थिती चांगली झाल्यावर पोट बंड करून उठते. आता पोटानेच सूड उगवायला सुरुवात केली आहे. कालपर्यंत पोटावर सूड उगवला. आता परिस्थिती उलटी झालेली आहे. भुकेचा रसनेशी असलेला संबंध बालपणातच तुटल्याने मिळेल ते खाल्ल्याने भुकेनेही उतरत्या वयात सूड उगवला आहे. दारिद्र्याने पोट मारले. जीवनाकांक्षा मारली. भुकेने बालपण आणि तारुण्य गुंतवून ठेले. इतरत्र लक्ष गेलेच नाही. सतत भुकेचा पाठलाग. त्यामुळे



अनुक्रमणिका

जीवनाच्या इतर अनेक आनंदाच्या बाजू अनोळखीच राहिल्या. शिक्षण घेतले पण त्यासाठी फार जबर किंमत मोजावी लागली. त्यात आई-बापांच्या जाण्याने लेखक खराच वनवासी झाला, अन् स्वतःलाच भुकेचा रस्ता विचारीत कष्टाने शिकत राहिला. ढोंगाने, दंभाने त्यांच्यावर कोरडेही ओढले. गरिबीला नातेवाईक नसतात आणि भुकेला मित्र नसतो हेच लेखकाच्या भूतकाळाचे सूत्र या 'बाळमुठीतील दिवसांनी' दाखवून दिलेले आहे.

नदीकाठच्या गावाचे वैभव म्हणजे गावाचा पाणवठा. त्या पाणवठ्यावर येणाऱ्या गावाची अत्यंत तरल सौंदर्यपूर्ण चित्रमय जाणीव 'गावचा पाणवठा-पाणवठ्याचे गाव' किंवा 'नदीकाठचा गाव' या दोन ललितलेखांमध्ये करून दिलेली आहे.

खेड्यातल्या माणसांना संस्कृतीच्या समृद्धीपेक्षाही शुद्ध व्यवहाराने अधिक पाहाण्याची सवय असते. त्यामुळे पोरगी कुठे द्यायची तर ज्या गावाला नदी आहे तिथेच द्यायची. हे ठरलेले उत्तर असे. तिचा पाण्यासाठी जीव पाखडू नये हाच शुद्ध हेतू त्यात असे. नदी असणे म्हणजे गावाला समृद्धी असणे हेच यामागचे व्यावहारिक थोरपण आहे.

पाणवठा हीच नदीची खरी शोभा असते. नदीकाठचा हा पाणवठा लेखकाच्या भूतकाळातील एक रसरशीत तुकडाच आहे. जीवनाच्या साऱ्या अवस्थांचे आणि पुरुषार्थांचेही दर्शन इथे घडते. धर्मकारण, अर्थकारण, कृषिकर्म हे सारेच इथे क्रमाक्रमाने येते. गावातल्या अनेकांच्या प्रेमकल्पनेचाही साक्षीदार हाच पाणवठा असतो. मंदिर आणि मसणवटा या दोघांनाही सारखेपणाने वागणारा हा पाणवठा त्यामुळेच गावाच्या श्रद्धेचा विषय बनून राहिलेला असतो. भारतातील पूर्ण पुरुष कृष्णाचे सारे आयुष्य ज्या यमुनाकाठी गेले, ती नदीच वगळून टाकली, तर कृष्णलीला त्या काय उरतील? राधा-कृष्णाच्या अशारीर प्रेमाचे जे गुणगान हजारो वर्षे आपण गातो आहोत त्याचे काय?

सुदैवाने लेखकाच्या गावाला दोन नद्या. त्यामुळे चंद्रभागेवरचा पाणवठा वेगळा. त्याचा रुबाब वेगळा आणि माणगंगेवरचा पाणवठा वेगळा त्याचा बाज वेगळाच.

भूतकाळात रमून गेलेल्या लेखकाला तो पाणवठा त्यावरची गजबज आजही स्पष्ट दिसते. तिथल्या वेगवेगळ्या वेळेची दृश्ये दिसतात. त्यांचे आवाज ऐकू येतात. त्याचा गंध आणि रंग जाणवू लागतो. दिसू लागतो. माणूस, निसर्ग आणि संस्कृती यांना जोडणारा हा पाणवठा लेखकाला त्यामुळेच महत्त्वाचा वाटतो.

जीवनातल्या व्याकरणाचे 'काळ' नेमके वेगळे असतात. पुस्तकी व्याकरणातील या काळाचे त्या काळाशी काय नाते असते याचे सुंदर विवेचन 'दिवसबुडीनंतरचा दिवस' या ललितलेखात पाहावयास मिळते. 'दुष्काळ' नावाच्या काळाने ज्यांचे सारे आयुष्याच झोकाळून टाकले आहे त्यांची व्यथा या ललितलेखामध्ये फार भेदकपणाने व्यक्त झालेली आहे. 'हा दुष्काळ गरीब माणसाचे आयुष्य जसे छोटे करतो, तसाच त्याचा दिवसही कुरतडून खात असतो.' असे म्हटलेले आहे आणि ते फार खरे आहे.

सातवीच्या वर्गात जाणाऱ्या गरीब पोराने बालपणाचा आनंदी काळ उपभोगण्याच्या वेळी दुष्काळ त्याच्यासमोर क्रूरपणे उभा राहातो. मग माणसं आणि जनावरं सारखीच भुकेली, तहानलेली होतात. सैरावैरा होतात. आई-वडिलांबरोबर कडक उन्हात दुष्काळी कामावर कामाला जाणारा बालपणीचा लेखक करपून जातो. झोप नाही, विश्रांती नाही, रात्री नदीला पाण्याला जायचे. तेही अशा थकलेल्या गात्रांनी. शरीराचा ठणका कुणाला सांगण्यासारखा नव्हता अन् मन तर कधीच बधीर झालेलं होतं.



अनुक्रमणिका

. दुष्काळ सरल्यावरही तेच. तीच मजुरी, तेच जीवघेणे शरीर कष्ट. भाकरीसाठी सगळी राबणूक मग रात्रभर कुणाचं खळं बडवायचा ठेका घ्यायचा. कुणाची हरवलेली म्हैस शोधण्यासाठी वणवण करायची. कुणाच्या व्यायला झालेल्या गाईची रात्रभर जागरणं करून देखभाल करायची. त्यात त्या गाईचं मेलेलं वासरू आणखी अस्वस्थ करीत असे. हे सारे रात्रीतच करायचे. झोप त्याच्या नशिबातच नव्हती.

पुढे महाविद्यालयात प्राध्यापक असताना झालेला सुभद्रा नावाच्या बहिणीचा अकाली मृत्यूही फार अस्वस्थ करतो. एका कॉलेजमधील मुलाच्या अपमृत्यूने रात्रभर झालेली फरपट. असे एकाहून एक सुन्न करणारे अनुभव या दिवसांनी दिलेले आहेत.

गावातल्या सर्वांच्या जिव्हाळ्याचे एक अपरिहार्य ठिकाण म्हणजे, किराणा मालाचे दुकान. लेखकाला ती ग्रामसंस्कृतीची आकाशवाणीच वाटते. साठ-सत्तर वर्षांपूर्वी गावाच्या ओळखीच्या खुणांमध्ये असे एकटे-दुकटे असणारे किराणा दुकान म्हणजे गावाची खरी ओळखच असे.

सकाळ-संध्याकाळ माणसांची झिम्मड असणारे हे ठिकाण त्याच्या अनेक प्रकारच्या मिश्र वासांमुळे दुरूनही लक्षात येत असे. चहाच्या लेकुरवाळ्या पुड्याच्या मुंडावळ्या घातलेले दुकान म्हणजे सदैव रसरशीत असणारे अजब रसायनच होते. शुद्ध करमणूक, निखळ आनंद, गावातल्या बऱ्यावाईट घडामोडी याचे सारे इतिवृत्त इथे ऐकायला मिळते. म्हणूनच खेड्यातला न्हाव्याचा अड्डा आणि किराणा दुकान ही जणू काही खेड्यातली दोन आकाशवाणी केंद्रेच आहेत. ग्रामसंस्कृतीचे अविभाज्य अंग असलेले हे किराणा दुकान ग्रामीण संस्कृतीचे आदानप्रदान करणारे एकमेव ठिकाण होते. विश्वासू दुकानदार आणि भरवशाची गिऱ्हाईके असा तो मामला असे. लेखकाने भूतकाळातून वर्तमानाकडे येताना आपले निरीक्षण नोंदविताना म्हटले आहे की, 'किराणा मालाच्या दुकानाचे स्वरूप आता विक्री केंद्रात बदलले आहे. दुकानातली ओसरणारी गर्दी लेखकाला अस्वस्थ करते. डॉ. द.ता. भोसले यांच्या ललितलेखनाचे हेच वैशिष्ट्य आहे की, ते सहजपणाने भूतकाळातून वर्तमानात येताना एक दुखरा स्वर घेऊन येतात. जो वाचकांच्याही काळजाला चटका लावून जातो. म्हणूनच हे केवळ लेखनासाठी केलेले लेखन नाही; याचा प्रत्यय येतो. त्यातल्या मनस्वीपणाने वाचकही सुखावून जातो.

अन्न, वस्त्र, निवारा याच महत्त्वाच्या गरजा आहेत. पण इथे लेखकाच्या गतकाळातील आठवणींमध्ये अन्नाची तर वाट लागलीच होती. ताट भरून जेवायला मिळण्याचे योग फारसे कधी आलेच नाहीत. पण अंगरक्षणापुरती असावीत अशा वस्त्रांचेही काही खरे नव्हते. इथली प्रत्येक गोष्ट केवळ गरजेपुरती, तिचा फक्त 'असण्याशी संबंध होता दिसण्याशी नाही'.

साठ-सत्तर वर्षांपूर्वी खेड्यातील वस्त्रप्रावरणे कशी जाडजूड असायची, ती 'टिकाऊ' असली पाहिजेत एवढीच अपेक्षा, असे असून 'दिखाऊ' पणाकडे माणसं वळलेली नव्हती. त्याचाही वेध 'अस्मादिकाची वस्त्रप्रावरणे' या ललित लेखात घेतलेला आहे. बायकांची लुगडी कशी तर 'घणघाव'. किंवा त्याचे दुसरे नाव 'वांड' असे आहे. सणासुदीलाच ठेवणीतले लुगडे किंवा सदरा असे, इतर वेळी अंगरक्षण हेच उद्दिष्ट्य असे. 'चेंज' हा प्रकार त्यांना परवडणाराही नव्हता. दंड घातलेली लुगडी तर सर्रास असत. आणि बाप्यांनाही दंडाची धोतरे म्हणजे अप्रतिष्ठितपणाचे वाटत नसे. शिंप्याने कपडे शिवताना ढगळच शिवले पाहिजेत असा आग्रह असे, कारण वाढत्या वयात पुन्हा नवे कपडे लवकर मिळणे कठीण असे. वाढत्या



अनुक्रमणिका

वयापेक्षाही कपडाचे मोल अधिक असे. शिंपीही कालबाह्य झाल्याची खंत लेखक व्यक्त करतात.

लेखकाचा सदराच इतका दयाळू होता की, तो चड्डीचे काहीही काम नाही हेच सुचवायचा. सदऱ्याचा रंग बदले. त्यावर जांभळापासून ते भोकरापर्यंत आणि तेलापासून ते चिखलापर्यंत असंख्य डाग पडत. दुकानात जायला पिशवी नेण्याची चैन न परवडल्याने सदऱ्यातच सारा माल आणला जाई. कितीही जपायचे ठरविले, तरी बिचाऱ्या सदऱ्याला मान टाकावी लागे. गरिबीच्या धगाट्याने लोकांचे मागून आणलेले कपडे म्हणजे उदार देणगी वाटायची. कपड्यांचाही जीव घेणारी त्या काळातली माणसे केवळ परिस्थितीने गांजली होती. चड्डीच्या खिशाला वस्तुसंग्रहालयाचे रूप येत असे. त्यावेळी लग्नातील अहेराचे कपडे फार मोलाचे वाटत असे. लेखकाच्या वडिलांनी भावकीतल्या नाना भोसल्याला पोराच्या चड्डीची निकड सांगितल्यावर 'बिनचड्डीचं शिकता येत न्हाई काय?' असे ऐकून घ्यावे लागले. भारताला स्वातंत्र्य मिळाले हे खरेच वाटत नाही; हे वाचल्यावर इतकी सामाजिक स्थिती नाजूक होती.

'मी आणि माझे चरणसेवक' या लेखातही पायातील वहाणा किती आणि कशा प्रकारे नाडणूक करतात, काटे मोडून मोडून कुरणे झाली तरी पायताण नाही. अगदी कॉलेजात गेल्यावरही चप्पल ट्रंकेत ठेवून दिली पाहिजे, नाहीतर ती झिजेल असे वाटत राहाणे फार क्लेशकारक आहे.

श्रमसंस्कृतीची आराधना करणाऱ्या खेड्यांमध्ये बलसंवर्धनासाठी तालमी बांधल्या जात. पीळदार शरीराची तरणीबांड पोरे हेच गावाचे वैभव मानले जाई. 'तालीम-ग्रामसंस्कृतीचे-शक्तिपीठ' या लेखातून याच्यावर प्रकाश टाकलेला आहे.

आता भूतकाळात जमा होऊ लागलेली सायकल एकेकाळी 'प्रेयसी' वाटत असे. गरिबांना परवडणारे एकमेव वाहन म्हणून ज्याचा लौकिक तेही लेखकाला कसे जेरीला आणते याचा खुमासदार परिचय 'माझी पहिली प्रेयसी' मधून घेतलेला आहे.

अभावग्रस्त लेखकाला साधी पत्र्याची पेटी सुद्धा दुरापास्त होती. पण तिची गाठ पडल्यावर तिने कसे त्यांचे बालपण आणि तारुण्य व्यापून टाकलेले आहे. अनेक निकराचे, जीवघेणे प्रसंग, गैरसमजुतीने कसे येतात याचे मासलेवाईक चित्र 'माझी शाळा सोबतीण' मध्ये आलेले आहे.

शालेय वयातील कोवळेपणाचे अंकुर सतत करपत राहिल्याने जगणे खुरटायला हवे होते. पण इथे लेखकाचे तसे झाले नाही. पुन्हा पुन्हा नवी पालवी फुटत राहिली. जोमाने हे झाड वाढत राहिले. आज ते डेरेदार झाले आहे. पण हे 'बालमुठीतील दिवस' तसे बालमुठीत बसत नाहीत. उलट बाळमूठच करकचून रक्ताळल्याचे विदारक दृष्य या ललित लेख संग्रहात पाहायला मिळते. मराठी ललित लेखनाच्या इतिहासामध्ये डॉ. द. ता. भोसले यांनी आपली स्पष्ट मुद्रा उमटविलेली आहे हे मात्र नमूद केलेच पाहिजे.

◇◇◇

**'बाळमुठीतले दिवस'**
डॉ. द. ता. भोसले
ललित
साकेत प्रकाशन, औरंगाबाद
*पृष्ठे :* १९१, *मूल्य :* रु. १५०/-

**डॉ. राजेंद्र दास**
कुर्डूवाडी, सोलापूर.
९८८१४२६४२९

पुस्तक परिचय

## 'हलचल' : संपादन, प्रकाशन आणि साहित्य क्षेत्रातील मुशाफिरी

– शंकर सारडा

*[प्रामाणिकपणा हा आत्मचरित्रलेखनातील एक मोठा अडथळा आहे; असे गुताँव फ्लॉबे याने म्हटले आहे. आत्मचरित्र म्हणजे स्वत:च्या जीवनाचा परखडपणे घेतलेला शोध होय! 'हलचल' हे आत्मचरित्र एका प्रकाशकाच्या जडणघडणींचे आहे. विपरीत परिस्थितीतून आपले जीवन कसे घडत गेले हे सांगताना स्वत:ला कुरवाळण्याची भाषा स्वत:वर खूष असलेली माणसे, सर्रास योजतात. श्री निपुणगे ह्यांनी स्वत:ला कुरवाळले नाही. स्वत:तील दुर्गुणही सांगताना त्यांनी हात आखडता घेतला नाही; कारण तीही एक 'हलचल'च! –संपादक]*

विशाखा दिवाळी अंक, पुष्पक प्रकाशन आणि गृहिणी व कृषीवल डायऱ्या यामुळे मराठी वाचकांना ज्ञात असलेले ह.ल. निपुणगे यांनी नुकतीच आपली पंचाहत्तरी पूर्ण केली. त्यानिमित्ताने त्यांनी आपले आत्मकथन लिहून ते 'हलचल' या नावाने प्रसिद्ध केले आहे. त्यांचे बालपण आणि कुमार वय घोडेगाव खंडाळा मंचर (पुणे) सारख्या खेड्यात गेले. दुसरीत असताना वडिलांचे निधन झाल्याने काकांकडे मंचरला राहावे लागले. १९५० पासून ते पुण्यात आले. दिवसा आलेपाक, गंधाच्या बाटल्या, उदबत्त्या, सिनेमा तिकिटे वगैरे विकून आईला हातभार लावला. रात्रशाळेत नाव घातले. एका डॉक्टरकडे ऑफिसबॉय म्हणून काम मिळवले. वृत्तपत्रे घरोघर टाकूनही बघितले. त्यासाठी सायकल घेतली. पुढे इन्शुरन्स कंपनीत शिपाई म्हणून नोकरी मिळाली. कसेबसे मॅट्रिक झाले. आश्चर्य म्हणजे काळाबाजार नावाची कथा लिहिली. ती सकाळ मध्ये छापून आली. पाच रुपये मानधन मिळाले. नंतर एक ग्रंथालय चालवले. एका कॉंट्रॅक्टरकडेही काम मिळाले. पुढे तीन वर्षे व्हीनस प्रकाशनमध्ये हरकाम्या म्हणून लागले. प्रकाशन व्यवसायाचे धडे मिळाले. त्यानंतर वोरा कंपनीत अमरेंद्र गाडगीळ यांच्या हाताखाली काम करण्याचा योग आला. या सर्व नोकऱ्यांच्या अनुभवानी आत्मकथनाची पहिली दीडशे पृष्ठे सजली आहेत. प्रकाशन विक्री क्षेत्रातील उमेदवारी भावी जीवनाला दिशादर्शक ठरली.



पुढे निपुणगे यांनी भागीदारीत एक प्रकाशन संस्था काढली. घरचे भांडवल नसल्याने सावकाराकडून वेळोवेळी कर्जे घेऊन पुस्तके काढली. शाळाशाळांना भेटी देऊन विकली. १९६३ मध्ये पुष्पक प्रकाशन ही स्वत:ची संस्था काढून पहिलेच पुस्तक चित्रकलेवरचे काढले. दुसरे कृषिविषयक अभिनव शेतकीशास्त्र. तशातच लग्न करून संसार थाटला. स्वत: 'नेहरूंचे जीवन प्रसंग' हे पुस्तक लिहिले. नेताजींवरचे पुस्तकही काढले. शालेय पातळीवर ते चांगले विकले गेले. तरी भांडवलाची चणचण असे. तेव्हा के.बी. कुलकर्णी व विर्ला यांना घेऊन नवी प्रकाशन संस्था काढली. ना.सी. फडके यांच्या 'अल्ला हो अकबर' या कादंबरीची नवी आवृत्ती काढायचे ठरवून दोन हजार रुपये देऊन हक्क

विकत घेतले. उद्धव शेळके यांची वळणावरचं वय ही एकदम 'हॉट' कादंबरी काढली. पण तिला फारसा प्रतिसाद मिळाला नाही.

१९७१ मध्ये नानासाहेब गद्रे यांच्या कन्याशाळेजवळच्या वाड्यातील दोन खोल्यांची जागा पाच हजार पागडी आणि साठ रुपये भाडे ठरवून निपुणगे यांनी पुष्पक प्रकाशनच्या कार्यालयासाठी घेतली. अमरेंद्र गाडगीळांच्या हस्ते ऑफिसचे उद्‌घाटन केले. कर्जाची फेड हा यक्षप्रश्न होताच. श्रीलेखन वाचन भांडारच्या ठोकळांनी शिक्षण खात्याच्या टेंडरमध्ये पुष्पकची पाच-सहा पुस्तके टाकली. प्रत्येकी दोनशे प्रती. दीड हजार रुपये त्यांना मिळाले. पुढे अशी अनेक टेंडर्स त्यांनी भरली. टेंडर्स भरताना केशवराव कोठावळे यांचेही सहकार्य मिळाले. मॅजेस्टिक गप्पांच्या निमित्ताने निपुणगे यांच्या अनेक लेखकांशी ओळखी झाल्या. गोव्यातील टेंडरच्या वेळी निपुणगे यांनी भरलेल्या टेंडरपेक्षा कमी रेटच्या मेहतांना टेंडर मिळाले. तेव्हा काहीजणांनी 'निपुणगे फुटले. त्यांनी आणि मेहतांनी हे सर्व आधी ठरवून केले.' असे केशवरावांच्या मनात भरवून टाकले. त्यामुळे संयुक्त टेंडर भरण्याचे बंद झाले. केशवराव आणि निपुणगे यांच्यात थोडाफार दुरावा निर्माण झाला.

१९७६ मध्ये निपुणगे यांना पौड फाट्याजवळच्या लक्ष्मी अपार्टमेंटमधला आधीच बुकिंग केलेला फ्लॅट मिळाला. वास्तुशांतीला अनेक लेखक-प्रकाशन उपस्थित होते, पण हा फ्लॅट निपुणगे यांना लाभदायक ठरला नाही. तो फ्लॅट विकून गावात फ्लॅट घेण्याचे त्यांनी ठरवले. शनिवार पेठेमध्ये करमरकर यांच्या जुन्या फ्लॅटमध्ये ते राहायला आले. ३७१ शनिवार पेठेतील वाड्याचे बांधकाम चालू होते. तेथे ५६०चौ. फूट फ्लॅट बुक केला. पण त्याचे बांधकाम रेंगाळले. त्या फ्लॅटचा ताबा मिळायला १९८५ साल उजाडावे लागले.

१९८१ मध्ये राजा फडणीस यांच्याकडून विशाखा दिवाळी अंक चालविण्यासाठी निपुणगे यांनी घेतला, दरवर्षी त्यात नवनवे उपक्रम राबवले. नवव्या प्रकरणात (पृष्ठ २७४ ते ३०८) विशाखाच्या प्रत्येक अंकांची वैशिष्ट्ये, विषय व जाहिराती यांची नोंद केली आहे.

त्या-त्या वेळच्या नामवंत लेखकांचे साहित्य मिळवण्यासाठी निपुणगे भरपूर पाठपुरावा करीत. ह.मो. मराठे (इतिवृत्त), बा.ग. केसकर (वावटळ), श्याम मनोहर (शीतयुद्ध, सदानंद) यांच्या कादंबऱ्या विशाखा दिवाळी अंकातच प्रसिद्ध झाल्या. बहुतेक नामवंत कथाकारांच्या कथा, विविध क्षेत्रांतील अग्रगण्य दिग्गजांच्या, कलावंतांच्या उद्योजकांच्या सर्वांगीण दर्शन घडवणाऱ्या मुलाखती-लेखांच्या पुरवण्या, प्रासंगिक लेख यामुळे विशाखा हे नाव वेगवेगळ्या संदर्भात लोकमानसापर्यंत पोहोचले. व्ही. शांताराम, शंतनुराव किर्लोस्कर, डी. एस. कुलकर्णी, डेकोरेलचे रवीन्द्र बाम, साठे बिस्किट कंपनीचे वि.ग. साठे, नवलमल फिरोदिया, रत्नाकर मतकरी, एस.एम. जोशी, नानासाहेब गोरे, श्रीराम लागू, भालजी पेंढारकर, कमलाकर सारंग, रणजित देसाई, अमोल पालेकर वगैरे ख्यातकीर्त व्यक्तींवरील 'विशाखा'पुरवण्या संग्राह्य आणि संदर्भ संपन्न ठरल्या. जाहिरातीसाठीही निपुणगे भरपूर मेहनत घेत. त्यांच्या चिकाटीमुळे 'विशाखा'ला स्थैर्य लाभले. जून १९८५ ते मे १९८७ या कालावधीत विशाखा मासिक म्हणून काढण्यात आले. मुखपृष्ठावर पानभर एका साहित्यिकाचे छायाचित्र आणि त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि साहित्याचे अंतरंग उलगडून दाखवणारे लेख यामुळे साहित्यिकांचे व सुजाण वाचकांचे त्यांनी स्वागत केले. परंतु मासिकाचे आर्थिक गणित मात्र जुळले नाही. त्यामुळे पुलंच्या छायाचित्राच्या अंकाने मासिक विशाखाचे भरतवाक्य लिहिले गेले. 'विशाखा'द्वारे निपुणगे यांच्या संपादन-प्रकाशन क्षेत्रातील योगदानाचे समृद्ध दर्शन घडते. एकंदरीत मी माझ्या

आयुष्यात तरलो ते विशाखा दिवाळी अंकामुळे असे ते मानतात.

पुष्पक प्रकाशनद्वारे गेल्या ३० वर्षांत सुमारे दीडशे पुस्तके प्रकाशित झाली. बेस्टसेलर पुस्तके निघावीत म्हणून निपुणगे यांनी अनेक ठोकताळे वापरून पाहिले. बा.ग. केसकर, सुशीला संकपाळ या नव्या लेखकांचे साहित्य आवर्जून काढले. उद्धव शेळके (अनौरस, साहेब, वळणावरचं वय), बाळ गाडगीळ (वळचणीचं पाणी-आत्मकथन), ह.मो. मराठे (मधलं पान, पक्षिणी), क्रिकेटचा ज्ञानकोश (रवींद्र पाटकर), ज्ञानेश्वर आणि कबीर (भिंगारकर) वगैरे लेखकांवर निपुणगे यांनी खूप प्रेम केले.

''परंतु एकंदरीत प्रकाशन व्यवसायात आपल्याला नशिबाने कधीच हात दिला नाही. अनेक विषयांवरील अनेक चांगल्या लेखकांची पुस्तके मी प्रकाशित केली, पण एकाही पुस्तकाच्या आवृत्त्या निघाल्या नाहीत. साहेब (उद्धव शेळके), देवाची पावले (रवींद्र भट) ही पुस्तके चांगली खपतील असे वाटले होते; पण त्यांनीही हात दिला नाही'' असे ते पुस्तकाच्या शेवटी म्हणतात.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामात लक्ष घालायला निपुणगे यांनी १९९२ पासून सुरुवात केली. १९९२ साली डॉ. जोगळेकर यांच्या पॅनेलमध्ये स्थान मिळावे असा त्यांनी प्रयत्न केला; परंतु जोगळेकर त्यांना म्हणाले, ''तुम्ही या फंदात पडू नका... आमचे पॅनेल पूर्ण झालेले आहे.''

तेव्हा निपुणगे यांनी एक वेगळे पॅनेल तयार करण्याची तयारी केली. १९९२च्या त्या निवडणुकीत निपुणगे निवडून आले. परिषदेच्या कामकाजाचे स्वरूप जाणून घेतले. १९९५च्या निवडणुकीत त्यांच्या पॅनेलचे ९ उमेदवार निवडून आले, पण ते स्वतः मात्र पडले. ते फार नर्व्हस झाले. त्यावेळी त्यांच्या पॅनेलचे निवडून आलेले एक सदस्य शंकर सारडा यांनी त्यांना म्हटले, ''नर्व्हस होऊ नका. स्वीकृत सभासद म्हणून तुम्हाला घेता येईल.'' त्याप्रमाणे निपुणगे स्वीकृत सभासद झाले. परिषदेतील एकूण राजकारण उबग आणणारे होते; हे त्यांनी दिलेल्या तपशीलांवरून लक्षात येते. पण त्यांनी पत्रिकेसाठी दरवर्षी एक लाख रुपयांच्या जाहिराती मात्र आणल्या. पुढे पत्रिकेचे संपादक, कोशाध्यक्ष वगैरे भूमिका त्यांनी पार पाडल्या.

असे बरेच काही या आत्मकथनात प्रांजलपणे निपुणगे यांनी लिहिले आहे. पुण्यातील आरंभीचे धडपडीचे दिवस, प्रेमविवाह, ऑफिससाठी कार्यालय, राहाण्यासाठी फ्लॅट, प्रकाशन व्यवसायातील उमेदवारी, दिवाळी अंकाचे संपादन, सहवासात आलेली माणसे, पठाणी व्याजाने पैसे आणून केलेले व्यावसायिक उपक्रम, लेखक-प्रकाशकांच्या व्यक्तिमत्त्वाचे चमत्कृतिपूर्ण पैलू, पत्नीच्या नोकरीने घराला लाभलेले स्थैर्य, जाहिरातदारांचे स्वभाववैचित्र्य - त्यातले नाट्य टिपण्याचे आणि त्यावर कधी खट्याळपणे, तर कधी उपरोधिक शैलीत केलेले भाष्य यामुळे 'हलचल' मध्ये वाचक रमून जातो.

◇◇◇

**हलचल (आत्मकथन)**
*लेखक :* ह.ल. निपुणगे
पुष्पक प्रकाशन, पुणे ३०
*पृष्ठे :* ३५२, *मूल्य :* रु. ३५०/-

**शंकर सारडा**
ई-१० पाटील रिजन्सी
१५, एरंडवणे, पुणे ४११००४. फोन.
९८२३२६१०२३



अनुक्रमणिका



एका कलावंताचे प्रांजळ आत्मकथन -

## 'खेळता खेळता आयुष्य' - गिरीश कर्नाड

– मेधा सिधये

गिरीश कर्नाड हे कन्नड, मराठी, हिंदी रंगभूमीवरील आणि चित्रपटसृष्टीतील विख्यात लेखक, दिग्दर्शक, अभिनेते. ज्ञानपीठ पुरस्कार सन्मानित, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय ख्यातीचे लेखक त्यांच्या 'खेळता खेळता आयुष्य' या आत्मचरित्राचा उमा कुलकर्णीकृत अनुवाद राजहंस प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. मूळ लेखन कन्नड भाषेतील आहे, त्याच्या खुणा पुस्तकात वेगवेगळ्या संदर्भात दिसतात.

'खेळता खेळता आयुष्य' हे शीर्षक म्हणजे 'नोडनोडता दिनमान आडाडता आयुष्य' या कन्नड म्हणीचा अनुवाद आहे. ही द्वयर्थी म्हण महाकवी बेंद्रे यांनी आपल्या 'नन्न किन्नरि' या गाजलेल्या कवितेची पहिली ओळ म्हणून वापरली आहे.

या जीवनकहाणीचा प्रारंभ एका नाट्यमय पण मनाला क्लेश देणाऱ्या घटनेने होतो. डॉ. मधुमालती गुणे यांच्या स्मृतीला ही आत्मकथा अर्पण करण्यातले औचित्य लक्षात येते. डॉक्टर वेळेवर न आल्यामुळे प्राण गमवावे लागल्याच्या घटना आपण ऐकतो, पण डॉक्टर न आल्यामुळे एक जीव जन्माला आला आणि तोच पुढे गिरीश कर्नाड या नावाने अभिमानाचा विषय ठरला ही घटना नक्कीच आनंददायक पण आपण 'नको होतो' ही गोष्ट आई-वडिलांच्या संवादातून अचानक कळल्यावर धक्का बसला. शिवाय न कळत्या वयात आईच्या पार्श्वभूमीविषयी वेड्यावाकड्या स्वरूपात लोकांची बोलणी ऐकायला लागल्यामुळे शिरसीतलं बालपणही मानसिकदृष्ट्या क्लेशकारक गेलं. वडील व्यवसायाने डॉक्टर - आई नर्स - दोघांना नाटकाची



आवड - आईला वाचनाचं वेड - संस्कृत भाषेविषयी प्रेम - ती जिद्दी, महत्त्वाकांक्षी, सुखोपभोगांची, श्रीमंतीची आस असलेली स्त्री! वडील सौम्य-शांत - लोकापवादाला घाबरणारे - धाडस, महत्त्वाकांक्षा नसलेले! पण आई-वडील, आईचा प्रथम पुत्र भालचंद्र आणि सर्व भावंडं यांचे संबंध प्रेमाचे, सलोख्याचे आहेत. या कौटुंबिक पार्श्वभूमीचं चित्रण आवश्यक त्या नेमकेपणाने यात केलेलं आहे. वडील शिरसीत ज्या हॉस्पिटलमध्ये नोकरी करीत होते तिथलं वातावरण, घराजवळचं चर्च, तेथे होणाऱ्या प्रार्थना, फादर फिगरेडोंची प्रवचने यांविषयी लिहिताना 'या धर्मगुरूच्या आत एक कसलेला नट दडलेला होता यात शंका नाही' (पृ.२६) असं वाक्य येतं. माणसाच्या वागण्या-बोलण्यातला अभिनय ओळखण्याची काहीशी दुर्मिळ क्षमता गिरीश कर्नाडांजवळ लहानवयापासूनच होती; हे इथे लक्षात येतं. बालपणीच्या आठवणींतले जेन्शन व्हायोलेट, एरंडेल, कॉडलिव्हर ऑईलं इ.चे उल्लेख कर्नाडांच्या पिढीतल्या वाचकांना गमतीदार वाटतील, कारण ते सारे त्या पिढीने अनुभवलेले आहेत. शिरसीत सिस्टर्सच्या आवारात 'धार्मिक अनुभूती' कशी आली, त्याचे वर्णन करून एकूणच धर्म ही

कल्पना माझ्या मनात उत्कटपणे पक्की करून समजावली गेली (पृ.२८) असे कर्नाड लिहितात. पण त्याचे स्पष्टीकरण मात्र करीत नाहीत. ख्रिस्ती धर्माविषयी आत्मीय भाव निर्माण झाला हे सांगताना हिंदुत्ववादी आणि कम्युनिस्ट यांच्यावरचा राग प्रकट झाला आहे, त्याचे निमित्त आहे मारिया अरोरा कुतो या त्यांच्या मैत्रिणीच्या ग्रंथाचे लेखन. 'तुला तुझ्या अंतर्मनात जे सत्य म्हणून भिडले आहे तेच तू लिहिले पाहिजेस' (पृ. २९) हा त्यांनी मैत्रिणीला दिलेला सल्ला वस्तुनिष्ठ, प्रामाणिक होता पण पुढे तिथेच अन्य विचारांच्या पक्षांचा उल्लेख करून त्यांना नैतिकदृष्ट्या खालच्या पातळीवर मोजण्याचे कारण स्वत:ची विशिष्ट मते. ती असल्याचे व्यक्तिस्वातंत्र्य प्रत्येकाला आहेच. पण मग पुढे त्याचे पुरेसे स्पष्टीकरण देणे अधिक योग्य ठरले असते.

धारवाडला कर्नाटक कॉलेजमध्ये गेल्यावर प्रथम प्राचार्य गोकाकांविषयी खूप आदरभाव निर्माण झाला, पण पुढे तो कमी होऊन नाराजी वाटू लागली. त्याच्या इतर कारणांबरोबर गोकाकांचा राजकीय दृष्टिकोन हेही एक कारण आहे. कर्नाडांच्या लेखनातला प्रांजळपणा मात्र नमूद केला पाहिजे. प्राचार्य गोकाक, प्रा. रामानुजन् , बी.व्ही कारंत या व्यक्तींविषयी मुळात त्यांना प्रेमादर होता, पुढे त्यांचे वागणे न पटल्यामुळे, काही कटु अनुभव आल्यामुळे या भावना उणावल्या, तरीही या व्यक्तींचे गुण, त्यांचे ज्ञान, कर्तृत्व त्यांनी मोकळ्या मनाने वर्णिले आहे. गिरीश कासर वळ्ळी, नासिरुद्दीन शहा या फिल्म इन्स्टिट्यूट मधल्या विद्यार्थ्यांनी संचालक गिरीश कर्नाडांना कटु अनुभव दिले; पण कर्नाडांनी त्यांचे भलेच केले. कर्नाडांनी 'स्क्रीन टेस्ट' रद्द केल्यामुळेच ओम पुरीला फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये प्रवेश मिळाला आणि त्याने रूपापेक्षा अभिनयगुण महत्त्वाचे असतात हे सिद्ध केले. याचे मोठे श्रेय कर्नाडांचे आहे. ते ओम पुरीने स्पष्टपणे मान्य केल्याचेही ते आवर्जून सांगतात. चित्रपटक्षेत्रात अय्यर पट्टाभि यांचेही तापदायक अनुभव आले, पण तरीही त्यांच्या गुणांचे ते कौतुक करतात. कर्नाड आणि वासुदेव यांनी 'संस्कार' चित्रपटाला यश मिळाल्यावर पट्टाभिविषयी जो अपप्रचार केला त्याची कबुली देऊन ते लिहितात, "आम्ही त्याच्या आर्थिक अडचणी समजून घ्यायला हव्या होत्या."

ज्या गोष्टी पटल्या नाहीत, आवडल्या नाहीत त्या सांगताना ते स्पष्टवक्तेपणा दाखवतात. सत्यजित रे यांनी बालसरस्वती यांच्यावर केलेली डॉक्युमेंटरी किती वाईट आहे, ते सांगताना "दोन श्रेष्ठ कलावंतांच्या अगाध अहंकाराचा नमुना" असा ते शेरा मारतात. बालसरस्वती यांच्या नृत्यकौशल्याचे फार सुंदर वर्णन ते करतात. राजकपूर, हेमामालिनी यांच्यापासून दूर राहिल्याची कारणे सूचित करतात. हबीब तन्वीर आणि विजय तेंडुलकर या दोघांनीही 'ययाति', 'हयवदन'चे ऋण व्यक्त केले नाही ही गोष्ट स्पष्टपणे सांगतात.

नाट्यलेखनात उत्कृष्ट यश मिळवलेल्या कर्नाडांच्या मनातला स्फुल्लिंग जागवला तो मात्र चित्रपटाने. डेव्हिड लीन या दिग्दर्शकाचा 'द ब्रीज ऑन द रिव्हर क्वॉय' हा चित्रपट पाहाताना कुणीतरी चलतचित्रलेखनाचा, एका दृष्टीने नाट्यलेखनाचा पाठच देत आहे अशी मला अनुभूती झाली' असे ते सांगतात. तसेच रामानुजन यांनी वाचायला दिलेल्या क्लिएंथ ब्रूकस आणि रॉबर्ट पेन वॉरन या दोघांनी लिहिलेल्या 'अंडरस्टॅण्डिंग पोएट्री' हा ग्रंथ सृजनशीलतेला एक शिस्तबद्ध आकार देणारं रचना-तत्त्व म्हणून उपयोगी पडला. एकोणिसाव्या शतकातली इंग्लिश समीक्षा जशीच्या तशी स्वीकारून संस्कृत समीक्षापद्धती नाकारणारे एस.सी.डे. यांच्यासारखे भारतीय विद्वान आता अभिनवगुप्त-आनंदवर्धन यांच्या

आधुनिकतेकडे चकित होऊन पाहातात; हे रामानुजन यांनी कर्नाडांना दाखवून दिलं. पण या झाल्या पुढच्या काळातल्या घटना.

बालपणी शिरसीत त्यांना 'यक्षगान' पाहायला मिळालं, त्यामुळे मनात नाट्यकलेचं बीज कुठेतरी खोलवर रुजलं. ती करमणूक अशिक्षित खेडवळांसाठी आहे असं मानलं जाई. पण त्या वयात 'यक्षगान'चा प्रभाव पडला. आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडली. शिरसीत उत्तर कर्नाटकातल्या नाटक कंपन्या 'कँप' टाकायच्या. कर्नाडांच्या वडिलांना सरकारी पास मिळायचे. १९४५ ते १९४८ पर्यंत गोकाकहून, जमखंडीहून आलेल्या कंपन्यांची नाटकं कर्नाडांना पाहायला मिळाली. १९४७ मध्ये सिद्धापूरच्या हुलिमने सीतारामशास्त्रींची जय कर्नाटक नाटक मंडळी शिरसीला आली असताना, वयाच्या नवव्या वर्षी 'धर्मसाम्राज्य' नावाचं नाटक अगदी सुरुवातीपासून टप्प्याटप्प्याने बसत असलेलं बघायची संधी मिळाली. या नाटकाचा किती जबरदस्त प्रभाव त्यांच्या मनावर पडला हे १९९७ साली लंडनच्या बी.बी.सी. रेडिओसाठी 'टिपू सुलतान कंडकनसु' (टिपू सुलतानने न पाहिलेलं स्वप्न) हे नाटक कर्नाडांनी लिहिल्यावर त्यांच्या लक्षात आले.

शिरसीत 'महिला समाजा'त येणाऱ्या नृत्यशिक्षकाकडे कर्नाड नृत्यही शिकले. दिग्दर्शक जांधियाल यांच्या 'आनंदभैरवी'या चित्रपटात त्यांनी नृत्यही केलं. ते लिहितात, 'नृत्यामुळे खूप आनंद मिळाला. आपण व्यावसायिक नर्तक का झालो नाही याचाही खेद मनाला स्पर्शून गेला. त्याचबरोबर व्यावसायिक नट म्हणून माझ्यामध्ये असलेल्या तांत्रिक त्रुटीही ठाऊक झाल्या. (पृ. ३४)

नृत्य शिकल्यावर नर्तक व्हावंसं वाटणं, कविता लिहिल्यावर कवी व्हावंसं वाटणं हे सगळं रसिक आस्वादक मनोवृत्तीच्या कलावंताला आणि त्या वयाला साजेसचं आहे. त्यांना दिग्दर्शक व्हायचं होतं; दिग्दर्शन त्यांनी केलंही, पण झाले नाटककार आणि अभिनेते. काही काळ ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस आणि फिल्म अँड टेलिव्हिजन मध्ये प्रशासक. धारवाड, मुंबई, लंडन, मद्रास, पुणे या सर्व ठिकाणच्या वास्तव्यात त्यांचं व्यक्तिमत्त्व आणि कर्तृत्व सतत फुलत, बहरत गेलेलं दिसतं.

कर्नाडांची अनुभव टिपण्याची सूक्ष्म दृष्टी, संवेदनशीलता ज्यातून व्यक्त होते त्या दोन गोष्टींचा उल्लेख आवश्यक वाटतो. शिरसीनं गमावलेल्या दोन पैलूंविषयी त्यांनी लिहिलं आहे. एक म्हणजे गाढ अंधाराचा अनुभव. 'दहा वर्षं माझं कुटुंब गाढ अंधाराचा अनुभव घेतं म्हणण्यापेक्षा रसास्वाद घेत जगलं' असं ते सांगतात. 'चकाचक प्रकाशामुळे उजेडाबरोबर असलेले आपले मुलायम, नाजूक संबंध नष्ट होतात.'असं म्हणून पुढे ते अंधाराचा आणि नि:शब्दतेचा घनिष्ट संबंध असल्याचं सांगतात. कलावंताचं मन कोणतेही इंद्रियानुभव उत्कटतेनं आणि कलात्म नजरेने कसा घेतो ते इथे दिसतं. कर्नाड लिहितात, 'अंधारात त्या शांततेत उजेड शंभर प्रकारांनी यायचा. इंद्रियांना शंभर प्रकारांनी उद्दीपित करायचा. चिमणी, कंदील, पणती, दिवटी, पेट्रोमॅक्स यांसारख्या वेगवेगळ्या दिव्यांच्या उजेडात वात जळून जळून काळवंडून गेली असता लपलपणारी ज्योत, तेल संपल्यावर असहाय्य होऊन विझून जाणारी ज्योत, धगधगणाऱ्या निखाऱ्याची कांती हे सगळं, मातीच्या भिंती, लाकडी खांब, शेणानं सारवलेली जमीन, कांबळ्याची वाकळ अशा असंख्य स्पर्शकतांवर (टेक्श्चरवर) पडून दिसणारं लावण्य आजच्या ट्यूबलाइटच्या सावली नसलेल्या सपाट उजेडात गमावलं गेलं आहे. ती सुकुमारता, ते वैविध्य आज आपण मुद्दाम शोध घेतल्याशिवाय आपल्याला मिळणार

नाही.' (पृ. ४०)

शिरसीने गमावलेला दुसरा पैलू म्हणजे रस्त्याच्या कानाकोपऱ्यात, गावाच्या नाक्यानाक्यांवर भेटणाऱ्या कथा. घरीदारी कथा ऐकायला मिळायच्या. राजपुत्र, भुतंखेतं, बळी दिलेल्यांचे आत्मे, वेताळ अशांच्या कथा कर्नाडांना एका अद्‌भुत जगात नेत. मुंबईत कर्नाडांचं 'ययाति' पाहिल्यावर विजय तेंडुलकरांनी त्यांना विचारलं होतं, "मराठीत पौराणिक पात्रं रंगवायची विशिष्ट पद्धत आहे. पण तुझी पात्रं समकालीन वाटण्याइतकी जिवंत वाटतात. हे कसं?" त्यावर कर्नाडांनी त्यांना सांगितलं, "ती सगळी शिरसीच्या रस्त्यांवर माझ्या ओळखीची झाली होती." (पृ.४१)

गणित आणि संख्याशास्त्र हे विषय घेऊन कर्नाड प्रथम श्रेणीत बी.ए. झाले. गणित आणि नाट्यतंत्र यांच्यातलं अनोखं नातं त्यांनी सांगितलं आहे. स्वतंत्रपणे डोळस विचार करू शकणारी कुशाग्र बुद्धीची माणसं, दोन परस्परविरोधी वाटणाऱ्या विषयांमधला आंतरिक नातेसंबंध कसा मार्मिकपणे पाहातात आणि उलगडून दाखवतात ते या विवेचनात पाहाण्यासारखं आहे. ते लिहितात, "मी अहोरात्र स्वत:ला त्या विषयात जसजसा गुंतवून घेऊ लागलो, तशी त्या विषयाची लय, आलाप, आरोह-अवरोह आणि त्यांचे लावण्य माझ्यापुढे साकार होऊ लागले. आल्ड्स हक्स्लेचं एक पात्र 'बायनॉमियल थिएरम'च्या सिद्धांताचं सौंदर्य जाणवून सद्‌गदित होतं, त्याच्या डोळ्यांत अश्रू येतात. गणितात लाटालाटांनी येणारी अलौकिकता तेव्हा जाणवू लागली, तेव्हा त्या पात्राच्या या प्रतिक्रियेत काहीही आश्चर्य नाही हे जाणवू लागलं. तरीही गणितातील शिस्तीनं माझ्या क्रियाशीलतेला कसा आकार दिलाय हे मला जाणवलं ते मी ऑक्सफर्डमध्ये बसून 'तुघलक' नाटक लिहायला सुरुवात केली तेव्हा!' (पृ.६४)

युगांतर, द अग्ली डक्लिंग, आंतिगोने, द मॅन ऑफ डेस्टिनी ही सगळी नाटकं माझ्या वाढीच्या एकेका टप्प्याची ओळख सांगतात असं सांगणाऱ्या कर्नाडांनी या नाटकांविषयी, त्यांच्या प्रयोगांविषयी संबंधित व्यक्तींविषयी ही माहिती दिली आहे. कीर्तिनाथ कुर्तकोटी यांनी 'ययाति'वर रसग्रहणात्मक लेख लिहिला त्याचा परिणाम म्हणून मी नाटककार झालो. असं स्पष्ट, दिलखुलास श्रेय त्यांनी दिलं आहे.

शिरसीहून धारवाडला आल्यावर कर्नाटक कॉलेजचे संस्कार, धारवाड आकाशवाणी केंद्राचे प्रतिभावान संचालक के.टी. पांडुरंगी यांच्याशी, कॉलेजच्या प्राध्यापक वर्गाशी होणाऱ्या चर्चा, मनोहर ग्रंथमालेच्या माडीवर रंगणाऱ्या बौद्धिक चर्चा, वादविवाद यातून वैचारिक जडणघडण झाली. कविवर्य बेंद्रे, के.जे. शहा अशा अनेकांचा प्रभाव पडला. काही गोष्टी खटकल्याही, पण सतत नवीन शिकण्याची, करून पाहाण्याची हौस आणि अभ्यासू वृत्ती या लेखनातून प्रत्ययाला येतो. जिथून जिथून जे-जे काही मूल्यवान मिळालं त्यासगळ्याची प्रगल्भ, कृतज्ञ नोंद केलेली आहे.

अस्काझींबद्दल लिहिताना, त्यांनी मराठी नाटकांवरील शॉंचा प्रभाव दूर सारला हे त्यांचे योगदान नमूद केले आहे. त्यांनी दिग्दर्शित केलेलं स्वीडिश नाटककार स्ट्रिंडबर्ग यांचं 'मिस ज्युली' हे नाटक पाहून प्रभावित झाल्याचं आणि प्रकाशयोजनेत डिमरचा उपयोग कसा करतात ते त्या प्रयोगातून कळल्याचं कर्नाड सांगतात. व्यावसायिक नाटकांचे प्रयोग बघताना त्यांना जाणवलं की, नाटकाविषयी आपल्याला बरंच शिकण्यासारखं आहे.

यू.आर. अनंतमूर्ती यांची 'संस्कार' कादंबरी वाचल्यावर कर्नाड खूपच प्रभावित झाले. ते लिहितात, "खरं सांगायचं तर एका समकालीन लेखकानं पहिल्यांदा माझ्या मनात मत्सर निर्माण केला होता.'

(पृ.२००) पण ही क्षणिक भावना कुरवाळत न बसता ते 'संस्कार'वर चित्रपट करण्याच्या तयारीला लागले. त्यावेळचे अनुभव त्यांनी विस्तृतपणे सांगितले आहेत. 'मद्रास प्लेअर्स'च्या कलावंतांनी या चित्रपटाच्या वेळी खूप सहकार्य केलं याचीही नोंद केली आहे.

या आत्मवरित्रातील आशयाशी समरस होताना फार खटकणारी गोष्ट म्हणजे याचा अनुवाद. वास्तविक उमा कुलकर्णी या सिद्धहस्त अनुवादक आहेत. कन्नडमधील कितीतरी चांगली पुस्तकं त्यांनी अनुवाद करून मराठीत आणली आहेत. पण या पुस्तकात मात्र वाचताना खूप ठिकाणी खडे बोचतात. हा दोष मुळातल्या कन्नड लेखकाचा की अनुवादकर्तीचा याचा शोध दोन्ही भाषा अवगत असलेल्या, भाषिक जाण असलेल्ला व्यक्तीच घेऊ शकतील, पण खटकलेले शब्द, वाक्ये यांची नोंद करणे आवश्यक आहे.

'त्यांनी ताटाआड चेहरा लपविला.' (पृ.१) जेवायला बसलेले असताना ताटाआड चेहरा कसा लपवता येईल? या वाक्याचा अर्थ लक्षणेने घ्यायचा म्हटले, तर आशय लक्षात येण्यात काहीच अडचण नाही, पण अनुवाद खटकतो. विज्ञानाच्या पै मास्तरांनी छंदशास्त्र शिकवले, त्या संदर्भात आलेल्या 'एक सूर्योदय वार्धक्य षट्पदीला धडकून भामिनी षट्पदीला अडकला' या वाक्याचा सुतराम अर्थबोध होत नाही. कदाचित ही कवितेची ओळ असेल, पण मग ती अवतरण चिन्हात कवितेसारखी छापून कंसात स्पष्टीकरण द्यायला हवे होते. जसे स्पर्शकता म्हणजे 'टेक्श्चर' हे कंसात दिलेले आहे. त्याकाळी भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात तळपत असलेले सर्वपल्ली राधाकृष्णन् (ते भारताचे उपराष्ट्रपती होते!) यांच्या आत्मसंभावित आणि अति शिजलेल्या भाटापासून आपण दूर राहिलं पाहिजे हा आमचा पहिला नियम होता.' (पृ.६८) 'अति शिजलेला थाट' हा काय प्रकार आहे? तरीही मला भावला तो नाटकाचा बांधेसूदपणा आणि चरबीविरहित थेठ 'बंदिस्त संवाद' (पृ. ७७) चरबीविरहित संवाद हा कोणता मराठी शब्द? धारवाडसारख्या एका मध्यम आकाराच्या गावातून मुंबईसारख्या महानगरात गेल्यावर एका तरुणाला ज्या प्रकारचा अपमान, अनुमान, आमिष, प्रचोदन आनि कटकटींना सामोरं जावं लागतं, त्या सगळ्यांतून मीही गेलो' (पृ.९३) अपमान, आमिष समजू शकतं पण 'अनुमान', 'प्रचोदन' हे शब्द इथे खटकतात. 'मी मुंबईत असताना त्यांच्या 'आंतिगोने'च्या दोन आवृत्त्या पाहिल्या. त्यातल्या एका प्रयोगात ....(पृ.९५) इथे दोन आवृत्त्यांऐवजी दोन प्रयोग असे म्हणायचे असावे. हा संदर्भ पुस्तकांच्या आवृत्त्यांचा नसून, प्रयोगांचा आहे. दोन प्रयोगांत भूमिका केलेल्या दोन अभिनेत्रींचं पुढे वर्णन आहे.

समृद्ध आयुष्य जगणाऱ्या एका कलावंताच्या कलाप्रवासाविषयी वाचताना हा अनुवाद अनेक ठिकाणी खटकतो आणि रसभंग होतो. अशा जागा मूळ लेखकाने आणि प्रकाशन संस्थेने सुधारून कशा घेतल्या नाहीत याचे आश्चर्य वाटते.

पृ. २०० वर रामानुजन नेहमी सांगायचे ते एक वाक्य येतं. 'भाषांतर म्हणजे कुणीतरी निर्माण केलेल्या श्रेष्ठ कृतीला आपलंसं करून घेणं. मूळ कलाकृतीविषयी पोटशूळ उठला नाही, तर उत्तम अनुवाद करणं शक्य नाही' हे विधान पुरेसं बोलकं आहे.

या आत्मचरित्रात साहित्य, तत्त्वज्ञान, नाट्य, नृत्य, चित्रपट या क्षेत्रांतील तज्ज्ञ व्यक्तींविषयी वाचायला मिळते. राजकारणी व्यक्तींच्या वागण्याचे चांगले-वाईट अनुभव, विद्यार्थ्यांचे, सहकाऱ्यांचे अनुभव हे सगळे स्पष्ट, तटस्थपणे लिहिलेले आढळते. स्वत:च्या लैंगिक संबंधाविषयीही आडपडदा न ठेवता लिहिलं

आहे. हेलेन बर्टन, सेस्किया, ॲन डंकन अशा काही स्त्रियांशी आलेल्या संबंधांविषयी लिहिताना ते याविषयाची माहितीही पुरवतात.

ऑक्सफर्डहून मुंबईला परत आल्यावर एक दिवस कर्नाडांनी ऐंशी वर्षांची काकू त्यांना भेटायला आली. आता आपल्या जातीतल्या मुलीशी लवकर लग्न कर बाबा, म्हणजे मी डोळे मिटायला मोकळी असं ती म्हणाली यावर कर्नाडांचा शेरा - 'या असल्या वात्सल्यापुढं कुठली क्रांती उभी राहाणं शक्य नाही आणि माझा मीच अवाक झालो. (पृ.१६०) कर्नाडांना कुठली क्रांती अभिप्रेत आहे हे स्पष्ट होत नाही. 'आपल्या जातीतली मुलगी' हा भाग वगळला तर अशी वेडी माया करणारी माणसं भारतात आहेत म्हणूनच 'भारत' हा भारत आहे. कर्नाडांची पाळंमुळं देशी आहेत, या मातीतली आहेत. एका बुद्धिजीवी व्यक्तीचे कालानुभव वाचकांना समृद्ध करणारे आहेत.

आपल्या वाग्दत्त वधूशी, चौदा वर्षे थांबून, वयाच्या वेचाळिसाव्या वर्षी त्यांनी विवाह केला. तिच्यापासून त्यांनी काहीही लपवले नाही. तीही अमेरिकेतल्या 'मुक्त' वातावरणात दहा वर्षे राहिलेली होती. या दोघांच्या विवाहापर्यंत येऊन ही आत्मकथा संपते. १९७६ पर्यंतच्या आयुष्यातल्या घटना यात सांगितल्या आहेत. कर्नाडांचा जन्म १९३८चा म्हणजे फक्त तीस वर्षांचा (बालवयातली काही वर्षे वगळता) पट इथे मांडलेला आहे. हा वाढीच्या वयापासून कर्तृत्वाच्या बहरापर्यंतचा प्रवास आहे. पुढील काळातील जीवनानुभवांसाठी आत्मचरित्राच्या दुसऱ्या भागाची प्रतीक्षा करावी अशा तोलामोलाचे हे लेखन आहे.

◇◇◇

**मेधा सिधये**

**'खेळता खेळता आयुष्य' - गिरीश कर्नाड**
*मराठी अनुवाद :* उमा कुलकर्णी
राजहंस प्रकाशन, पुणे
*पृष्ठसंख्या :* ३०४, *मूल्य :* ३००/-
*मूळ प्रकाशक :* मनोहर ग्रंथालय, धारवाड.





अनुक्रमणिका



# मराठीतले नवचरित्र : व्यक्तिविमर्श

– जयन्त वष्ट

*[चरित्र, व्यक्तिचित्र, कलात्मकचरित्र याच्याही पलीकडे जाऊन व्यक्तित्वाचा सामाजिक, मानसशास्त्रीय, त्याचा भोवताल, त्याचे भोवतालशी जडलेले नाते आणि त्यातून उलगडले जाणारे चरित्रावर आधारित लेखन म्हणजे व्यक्तिविमर्श होय. डॉ. द. न. गोखले यांच्या चरित्रकलेचे वेगळेपण म्हणजे, चरित्रलेखनाचा अनवट वाटेने जाणारा व्यक्तिविमर्श, हा एक स्वतंत्र लेखनप्रकार मराठी साहित्यात प्रकटला. त्याच्या साहित्यरूपावर प्रकाश टाकणारा हा लेख.*

*–संपादक]*

आपण निवडलेल्या व जनमानसात, अभ्यासकांत मान्य असणाऱ्या चरित्रनायकाचे संपूर्ण आणि सजीव व्यक्तित्व समजून घेण्यासाठी, विविध अंगांनी आणि अधिक सूक्ष्मात जाऊन ते तपासण्याचा प्रयत्न एक चरित्रकार या नात्याने डॉ. द. न. गोखले नेहमीच करत असत. या प्रयत्नात इतिहास आणि साहित्याबरोबरच ते मानसशास्त्र, समाजशास्त्र यासारख्या मानवसंबंधित शास्त्रांचाही उपयोग करत, प्रसंगविशेषी व्यक्तित्वाच्या अंतरंगात शिरण्यासाठी त्यांनी 'कल्पकते'चा किंवा 'कल्पितसत्या'चाही वापर बुद्धिपुरस्सर केला. सत्याची कास न सोडता व्यक्तित्वाच्या आकलनासाठी त्यांनी सतत नवनव्या वाटांचा शोध घेतला. 'कल्पित सत्य' ही कपोलकल्पित गोष्ट नसते; हे वास्तवही ते सप्रमाण अभ्यासकांसमोर ठेवत.

चरित्रनायकाचा असा सर्व पैलूंसह अभ्यास करताना चरित्रकाराला उपलब्ध झालेल्या साधनसामग्रीतून गवसलेल्या 'सत्या'च्या लहान-मोठ्या अंशांचे एकत्रीकरण केल्यानंतर मनात तयार झालेल्या चरित्रनायकाचे शब्दांकन करताना ते लेखकाचे साहित्यरूप सांभाळत असत. ते भान त्यांच्या सर्वच चरित्रकृतींतून दिसते. आपल्या जवळ जवळ पन्नासांहून अधिक वर्षांच्या दीर्घ अभ्यासात त्यांना चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचा विस्तारणारा परीघ जसजसा जाणवत गेला, तशी त्यांची चरित्रलेखनपद्धती बदलत गेली. ती प्रचलित लेखनापेक्षा वेगळी होऊ लागली. लेखनाच्या बदलत्या पद्धतीमागची संशोधनाची दिशा लक्षात घेत त्यांनी यास विचारांती 'व्यक्तिविमर्श' हे नाव दिले. नवचरित्रांच्या या मांडणीचे सैद्धांतिक रूप काहीशा विस्ताराने वाचकांसमोर विषद करताना 'हा अगदी नवा नसला तरी वेगळा साहित्यप्रकार आहे.' असे स्वत:चे मतही त्यांनी मांडले आणि या पद्धतीने प्रयोग करत सावरकर, गांधी आणि आंबेडकर यांचे व्यक्तिविमर्शही अभ्यासकांना सादर केले

या तीन व्यक्तिविमर्शांतून डॉ. गोखले यांनी विमर्श लेखनाचे तीन वेगवेगळे प्रयोग केले. त्यामागे कोठेतरी आदर्श 'व्यक्तिविमर्श' मांडून हा नवाच असणारा लेखनप्रकार सिद्ध करण्याची प्रेरणा असल्याचे अभ्यासान्ती जाणवते. प्रत्यक्षात मात्र वाढत्या प्रकृतीक्षीणतेमुळे ते हा कार्यक्रम पूर्णतेप्रत नेऊ शकले नाहीत. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा व्यक्तिविमर्श तर त्यांच्या निधनानंतरच वाचकांच्या हाती पडला. डॉ. गोखले अभ्यासकांच्या विशेषत: सुबुद्ध रसिक वाचकांच्या विचारांसाठी-चर्चांसाठी-उन्नयनासाठी एक नवा साहित्यप्रकार मांडून गेले. मराठीतल्या आजवरच्या चरित्रलेखन प्रक्रियेच्या विकासात 'व्यक्तिविमर्श' हा

नवचरित्ररूपात स्थिरावण्याची शक्यता कितपत आहे, याचा विचार मांडण्यासाठी केलेले प्रस्तुत लेखन हाही एक प्रयोगच म्हणायला हवा.

व्यक्तित्वाच्या अंतरंगात खोल व सूक्ष्मात जाणारा हा चरित्रलेखनाचा नवा प्रकार आहे असे म्हणताना या लेखनपरंपरेच्या विकासाची पार्श्वभूमी थोडीशी लक्षात घेतली, तर 'व्यक्तिविमर्शा'ची कल्पना उलगडणे कदाचित सोपे जाईल. प्राचीन काळात चरित्रनायकाची (खरे तर तत्कालीन थोर पुरुषांची) आठवणरूपात नोंद या कारणाने सुरू झालेल्या या लेखनात प्रारंभी 'गुणवर्णनं' एवढीच कल्पना होती. पुढे काही काळाने त्यात वास्तवाधारित गुणदोषात्मक लेखनाचा समावेश झाला. गतशतकात मात्र काळाच्या पार्श्वभूमीसह व्यक्तीच्या कर्तृत्वाची नोंद घेणाऱ्या चरित्रलेखनास सुरुवात झाली; आणि लेखन प्रक्रियेबरोबर, शब्दांकन पद्धती बरोबरच विचारपद्धतीही बदल स्वीकारत विकसित होत गेली. 'व्यक्ती: काल आणि कर्तृत्व' या रूपात चरित्रनायक रेखाटले जाऊ लागले. आयुष्यातील घटनाक्रमाची काळानुसार मांडणी करता करता व्यक्तित्वाच्या अंतरंगांचाही उल्लेख येऊ लागला. मात्र व्यक्तित्वाच्या परीघाचा विस्तार लक्षात घेतला तो व्यक्तिविमर्शात्मक लेखनातच. ही नवी चरित्र विचार-पद्धती एक वाङ्मयप्रकार मानत व्यवहारात डॉ. गोखले यांनी आणली, म्हणून ते मराठीचे पहिले व्यक्तिविमर्शक ठरतात.

सावरकर, गांधी आणि आंबेडकर यांच्या व्यक्तिविमर्शाचा विचार करता त्यात आणि चरित्रात बरीच साम्यस्थळे आढळतात. तरीही गोखले यांना 'व्यक्तिविमर्श' वेगळा वाङ्मयप्रकार मानावा असे वाटते. हे दोन्ही वाङ्मयप्रकार व्यक्तित्वाशी संबंधित, शुद्ध वास्तवाधारित असले, तरी चरित्रातून घेतला जाणारा व्यक्तित्वाचा शोध साहित्यप्रधान असतो आणि कलेच्या अंगाने विस्तारत वाङ्मयीन कृतीतून सिद्ध होतो. पण व्यक्तिविमर्शात मात्र व्यक्तित्वाचा विचार मानवाशी संबंधित शास्त्रांच्या आधारे विस्तारत शास्त्राच्या प्रांतातही विहार करत चरित्रापेक्षा वेगळा परिणाम साधतो, असे गोखले यांचे निरीक्षण दिसते. व्यक्तिविमर्शकाची मानसिक प्रक्रिया चरित्रकारापेक्षा वेगळी असते हे, सांगताना त्यात **व्यक्तिदर्शनापेक्षा व्यक्तित्वाच्या विश्लेषणास जास्त महत्त्व असल्याचे ते सांगतात.** वाचकांना चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचा कलात्मक अनुभव देण्यापेक्षा ते त्याच्या बुद्धीला साधार-सप्रमाण पटवून देण्याकडे व्यक्तिविमर्शकाचा अधिक कल असतो; असे गोखले मानतात. **विमर्शात 'प्रतिभे'पेक्षा 'प्रज्ञे'चा उच्चतम बुद्धीचा उपयोग जास्त असतो, असे त्यांचे प्रतिपादन आहे.**

मानवी मनातील विविध गुंतागुंतींचा शोध घेणे, त्या दूर करण्याचा प्रयत्न करणे हा शास्त्राचा धर्म असतो. मानवी मनाचे वेगवेगळे पैलू समजून घेत - दिग्दर्शित करत कलाकृतिद्वारा रसिकांसमोर मांडण्याचे, उलगडण्याचे कार्य साहित्य करते. व्यक्तिविमर्शक या दोन्हींचा समन्वय साधतो. सत्य सांभाळत तो व्यक्तित्वाच्या अंतरंगाचा शोध घेतो व त्यातून जाणवणारे तथ्य अभ्यासकांसमोर ठेवतो. शास्त्र आणि कलेच्या अपेक्षांचे भान ठेवत तो मनाचा तळ गाठतो आणि वाचकांना कलानंदही देतो. हे जर 'सहज' साधता आले तर तो व्यक्तिविमर्श डॉ. गोखले यांच्या मते 'यशस्वी' ठरतो, दर्जेदार होतो.

त्या-त्या वेळच्या परिस्थितीची जाण ठेवून चरित्रनायकाच्या आयुष्यातील **घटना-प्रसंगांच्या आधारे विमर्शकाने व्यक्तित्व समजून घेणे येथे महत्त्वाचे असते.** मात्र त्या निमित्ताने कोरडी समीक्षा वा क्रिया-प्रतिक्रियांवरची वरवरची टीका यात अपेक्षित नसते, तर या क्रिया-प्रतिक्रियांच्या सहाय्याने व्यक्तित्व उलगडत

विमर्शकाने मूल्यमापनाकडें जायला हवे अशी डॉक्टर गोखले यांची अपेक्षा आहे.

उपलब्ध घटना-प्रसंगांची तत्कालीन परिस्थिती लक्षात घेता वास्तवाच्या निकषांवर निवड केल्यानंतर त्यातून लक्षात येणारे व्यक्तित्वाचे विविध घटक निवडून-पाखडून घेतल्यानंतर व्यक्तिविमर्शकाच्या मनात या घटकांची संयोग-वियोग प्रक्रिया होते आणि त्यानंतर त्याच्या डोळ्यांसमोर चरित्रनायकाचे त्याच्या दृष्टीने त्याला समजलेले खरेखुरे व्यक्तित्व उभे राहाते. या समोर दिसू लागलेल्या व्यक्तित्वाचे शब्दमाध्यमातून वाचकांना दर्शन घडवणे ही सहज होणारी प्रक्रिया नसते, तर त्यासाठी **शब्दांकन पद्धतीही त्याला निश्चित करावी लागते.**

चरित्रनायकाच्या जीवनातील घटना-प्रसंगांचे वरील पद्धतीने विश्लेषण करताना विमर्शकाच्या असे लक्षात येते की, एकेका घटनेतूनही व्यक्तित्वाचे अनेक घटक प्रतिबिंबित होतात आणि मग त्या त्या घटकाच्या निवेदनाच्या निमित्ताने संबंधित घटना-प्रसंगाची पुनरावृत्ती होते. तेव्हा काहीशा चातुर्यपूर्ण निवेदन पद्धतीने ही पुनरावृत्ती शक्य तेवढी टाळावी. पण तरीही अपरिहार्य-अनिवार्य ठरत असेल, तर अशी पुनरावृत्ती विमर्शकाचा दोष मानू नये तर तेथे त्याची ती-ती भूमिका लक्षात घेत वाचकांनी परिस्थिती समजून घेण्याचा प्रयत्न करावा, असे गोखले यांचे म्हणणे आहे. अशा वेळी ते वाचकांकडूनही सहकार्याची अपेक्षा करताना दिसतात.

व्यक्तित्वाच्या विस्तारलेल्या परीघाविषयी एक विमर्शक या नात्याने स्वत:ची कल्पना स्पष्ट करताना डॉ. गोखले म्हणतात की, ''साधारणत: अशी एक रीत पडलेली आहे की, माणसाच्या शारीरिक ठेवणीत नि त्याच्या पोशाखाच्या पद्धतीत त्याच्या व्यक्तित्वाचा आविष्कार बघावा. त्याचे घरातले वागणे, त्याच्या लकबी, त्याचे घरगुती प्रसंगातले बोलणे-चालणे वगैरे गोष्टी त्यात घालाव्या. मी हा (व्यक्तित्वाचा) परीघ बराच व्यापक मानतो. मनुष्याच्या प्रत्येक हालचालीत, त्याच्या लहान-मोठ्या प्रक्रियेत त्याचे व्यक्तिमत्त्व प्रकट होते असे मी मानतो. अर्थात ते दर्शनात असते, सगळ्या वागण्यात असते, त्याच्या भावभावनेत असते, विचारांतही असते. ते जेवढे स्थूल तेवढे सूक्ष्म असते, जेवढे स्थिर तेवढे प्रवाही असते, जेवढे एकरूप तेवढे अनेकरूप असते, जेवढे वर्तमानकालीन तेवढे भूतकालीन आणि भविष्यकालीनही असते.'' (आंबेडकरांचे अंतरंग, प्रस्तावना, पृष्ठ एकोणतीस) व्यक्तिविमर्शात व्यक्तीमधील एकरूपता आणि सातत्याबरोबरच ती मधील विकास आणि परिवर्तनेही डॉ. गोखले यांच्या मते बघावी लागतात.

व्यक्तिविमर्शातील व्यक्तित्व-विचारात व्यक्तित्वाच्या मूलद्रव्यांचे पृथक्करण करता करता ती कशी सबल वा दुर्बल आहेत याचा विचार अभिप्रेत आहे व त्याचबरोबर त्यांच्या संयोग-वियोगाधारे विकास आणि व्यक्तित्वाची जडणघडण ही स्पष्ट करायची आहे. म्हणजेच व्यक्तिविमर्शात व्यक्तित्वाचा उलगडा तसेच व्यक्तित्वरूपाचे आविष्करण असते. प्रेम, द्वेष, विचार, निष्ठा, प्रामाणिकपणा, धूर्तपणा, बुद्धिमत्ता, कौशल्य, आळस, भीती, निष्ठुरता आदी अनेक मूलद्रव्ये व्यक्तित्वात सामाविष्ट आहेत आणि या मूलद्रव्यांचे मिश्रण, मूलद्रव्ये कमी-जास्त होत होत कालप्रदेशात वाहत जाते. डॉ. गोखले यांच्या मते या सर्वांच्या अभूतपूर्व मिश्रणातून तयार होणाऱ्या व्यक्तित्वाचा विशेष सांगणारी मूलद्रव्ये सांगणे आणि ते-ते वैशिष्ट्य स्पष्ट करणारी, दाखवणारी मिश्रणे हुडकणे हेच व्यक्तिविमर्शाचे उद्दिष्ट आहे.

ही मूलद्रव्ये बव्हंशी सामान्य माणसाच्या सामान्य जीवनातील आहेत. व्यक्तिविमर्शही माणसाच्याच व्यक्तित्वासंबंधी असेल तसेच तो माणसाच्या मनाशी

जोडलेला असला तरी तो सर्वस्वी केवळ मानवाशी संबंधित मानसशास्त्र, समाजशास्त्र अशा इतर शास्त्रांवरच अवलंबून नाही. **शास्त्राच्या धाग्याबरोबरच साहित्य-कलेचा धागाही यात गुंफलेला आहे.** साहित्य ही मनाचे आणि वर्तनाचे उन्नयन त्याही पूर्वीपासून करत आहे. हे साहित्याचे कार्यही तितक्याच सातत्याने, कसोशीने, बारकाईने, सूक्ष्मपणे हळुवारपणे होत आहे. साहित्यातील दिग्गजांच्या कथा, कविता, कादंबरी-नाटकांकडून हे होते आहे. थोडक्यात जर सांगायचे, तर मानसशास्त्राप्रमाणेच साहित्यशास्त्राकडूनही व्यक्तिविमर्श उसनवारी करतच असतो. समोरच्या जिज्ञासू, सूज्ञ व रसिक अशा अभ्यासू वाचकांसाठी चरित्रनायकाचे व्यक्तित्व उलगडून दाखवणे हेच व्यक्तिविमर्शाचे काम असल्याने त्यासाठी साहित्य आणि शास्त्र यांसह व्यवहारातील अन्य शास्त्र-ज्ञानाचीही मदत तो घेतो; हे डॉ. गोखले यांनी आवर्जून सांगितले आहे. पण प्रसंगी ही शास्त्रेही व्यामिश्र मानवी व्यक्तित्व उलगडण्यास अपुरी पडतात. त्यातील विविध मतमतांतरांची (स्कूल्स) वा मतप्रवाहांची क्षमता माणूस समजण्यासाठीचे प्रयत्न करत असतातच, पण व्यक्तित्व त्याच्यापलीकडेच असते. हा अनुभव डॉ. गोखले, डॉ. केतकर, माधवराव पटवर्धन यांची व्यक्तित्वे उलगडताना आला होताच. सावरकर, गांधी, आंबेडकरांच्या व्यक्तिविमर्शांच्या निमित्ताने तो अधिकच पक्का झाला आहे.

साग्रसंगीत वर्णन करत न बसता थोडक्यात इतरांहून वेगळी जाणवणारी व्यक्तित्वाची वैशिष्ट्येच सांगायची असतात. त्यात कामसू-आळशी, आशावादी-निराशावादी अशा जोड्या जरी वापरता येत असल्या, तरी ती त्या-त्या व्यक्तित्वाशी तेवढ्यापुरती-तात्पुरती ओळख असते. ते कायमचे वर्गीकरण होत नसते. शिवाय त्यात गोखले यांच्या मते प्रेरणांपेक्षा प्रवणतेचाच भाग असतो. परिणामी त्यातून व्यक्तित्वाचा कल लक्षात येतो एवढेच. प्रेरणेत कृती घडवणाऱ्या शक्तीबरोबरच आतून लोटणारी शक्ती असते. तसे प्रवणतेत नसते. प्रेरणा व प्रवणता हे येथे प्रकारभेद नसून, प्रमाणभेद असल्याचे गोखले स्पष्ट करतात. त्यांनी व्यक्तिवैशिष्ट्य सांगण्यासाठी प्रवणतादर्शक शब्दांचा प्रयोग अधिक केल्याचे दिसते. व्यक्तिविमर्शास अभिप्रेत एवढ्याच मूलद्रव्यांचा विचार डॉ. गोखले समोरच्या वाचकाला ध्यानी ठेवत करताना दिसतात.

व्यक्तिविमर्श व्यक्तित्वातील सत्याचे घटक शोधणारा असल्याने तो शास्त्राबरोबरच कलेच्याही प्रांतात येतो, हे सांगतानाच तेथे कल्पिताला जागा नसल्याचे डॉ. गोखले स्पष्ट करतात. व्यक्तिविमर्श चरित्राला आणि चरित्रकलेला समांतर असल्याने व्यक्तिविमर्श कलेला समांतर असल्याचेही सांगतात. चरित्र देते तोच जीवनानुभव व्यक्तिविमर्श देत असला, तरी त्यात **व्यक्तित्वाचा उलगडा करून दाखवण्यावर भर असतो.** त्यासाठी तो विश्लेषणाचे व्यक्तित्वाच्या मूलद्रव्यांचे, त्यांच्या संयोग-वियोगाचे साधन वापरतो. त्याचा कल 'कलानुभव' देण्यापेक्षा 'ज्ञानानुभव' देण्याकडेच असतो. सौंदर्यानुभवात तो चरित्राच्या तुलनेत काहीसा उणा पडतो, हे गोखले सांगतात.

व्यक्तित्वाचा अर्थ लावून त्याचे विश्लेषण करून ते उलगडून दाखवता दाखवता मूल्यमापनही ह्या नव्या लेखनप्रक्रियेत होते. या दृष्टीने विचार केल्यास व्यक्तिविमर्श चरित्रापेक्षा वरचढ आहे. त्यातले विश्लेषण हे स्पष्ट, प्रत्यक्ष आणि उघडपणे केलेले असते. याविषयी डॉ. गोखले म्हणतात की, ''व्यक्तित्वाच्या बाबतीत चरित्र म्हणजे बुरख्यात दडलेली सुंदरी असते, तर व्यक्तिविमर्श म्हणजे बिकीनी पेहेनलेली बिनधास्त सुंदरी असते.'' व्यक्तिविमर्शाचे तीन प्रयोग करताना त्यांच्यासमोर मराठीतलाच नव्हे, तर इतर

कोणत्याही भाषेतला नमुना वा मांडणीचा आदर्श नव्हता. त्यामुळे व्यक्तिविमर्श कसा आणि कोणत्या प्रकारे सिद्ध करावा याचे निर्णयस्वातंत्र्य ते व्यक्तिविमर्शांत घेतात.

व्यक्तिविमर्श व्यक्तिचित्रापेक्षा दीर्घ असतो हे स्पष्ट करतानाच तेथे केवळ लेखकाच्या बाह्य लांबीरुंदीचा नव्हे, तर आशय आणि अंतरंगाचाही फरक असल्याचे त्यांनी सांगितले आहे. तेथे लेखकाच्या मनात साधली जाणारी लेखनप्रक्रिया ही वेगळीच असते याची कल्पना ते या निमित्ताने देतात. वर म्हटल्याप्रमाणे व्यक्तिविमर्शाची स्वत:ची म्हणून काही विशिष्ट परंपरा वा पद्धती 'नमुना' रूपात डोळ्यांसमोर नसल्याने त्यांना मांडणीचे सर्व मार्ग मोकळे होते. **मात्र हा लेखनप्रकार सत्याचा शोध घेणारा, सौंदर्यासह शास्त्रीय बाजूही जपणाऱ्या मांडणीचा व्हावा, अशी त्यांची अपेक्षा होती.** अंगभूत सौंदर्य असणारा व्यक्तीच्या जीवनाचा आशय त्यांना अभिव्यक्तीच्या मांडणीसह साधायचा होता. बौद्धिक आकलनासह तपशील पुरवत तो इंद्रियभोग्य करत 'सजीव' करण्याची कल्पना त्यामागे होती. व्यक्तिविमर्शकाने प्रतिभावान कलावंतांच्या भूमिकेत वावरावे अशीही अपेक्षा त्यात होती. तरच गोखले यांच्या मते व्यक्त केल्या गेलेल्या आशयाला प्रतिभेचा परिसस्पर्श लाभून अनुभवांचे रूपांतर सुवर्णात होणार होते. यात सुबुद्ध व रसिक वाचकाने सौंदर्यपिपासू सत्यशोधकांसारखे व्हावे; असे त्यांना वाटत होते. सत्याच्या काही अंगांचा आविष्कार करताना सौंदर्याच्या काही अंगांचा प्रत्यय यावा आणि सौंदर्याच्या दर्शनात सत्याची अंगेही प्रतिबिंबित व्हावीत, ही अपेक्षा यात होती. विश्लेषण-संश्लेषणाद्वारे हे साधता साधता एकाच साहित्यकृतीत सत्य आणि सौंदर्याचा अनुभव देण्याचा हा प्रयोग काही सोपा नव्हता. यात डॉ. गोखले बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाल्याचे अभ्यासान्ती वाचकांना निश्चितच जाणवते.

चरित्रचिंतनातून लेखनप्रक्रियेस नवी दिशा देत सूक्ष्म अभ्यासाद्वारे ती पुढे नेणाऱ्या 'व्यक्तिविमर्श' या वाङ्मयरूपाचा काहीसा परिचय करून घेतल्यावर आता डॉ. गोखले यांनी केलेल्या तीन वेगवेगळ्या लेखन प्रयोगांकडे थोडेसे जिज्ञासेने पाहू. १९८९ मध्ये 'स्वा. सावरकर: एक रहस्य'च्या लेखनाच्या निमित्ताने गोखले यांनी व्यक्तिविमर्शात्मक लेखनाची सुरुवात केली. त्यावेळी त्यांनी सावरकरांच्या व्यक्तित्वाच्या एकेका अंशाचा वेध घेतला. मानसिकता अनुकूल होण्यासाठी, शारीरिक दुर्बलतेतून सुधारणा होण्यासाठी ते त्यावेळी आजारपणाशी झगडत होते. सावरकरांचा आधार मनाला एका बाजूला होता, पण आपण सर्व अंशांचे लेखन करू शकू याची खात्री त्यांना वाटत नव्हती. स्वहस्ते लेखन करण्याची स्थिती नव्हती. अर्धांगाच्या कारणाने साधी वेलांटी काढायलाही भरपूर वेळ लागावा अशा स्थितीत सावरकरांच्या व्यक्तित्वातील विचारांद्वारे स्वत:चे मनोबल वाढवत ते लिहीत होते. तेव्हा वेगवेगळ्या लेखांच्या संग्रहरूपात त्यांनी हे लेखन केले. व्यक्तित्वाच्या निरनिराळ्या घटकांवर लक्ष केंद्रित करताना एकाचवेळी संपूर्ण व्यक्तित्वावर, सर्वांगाने जाणीवपूर्वक लक्ष केंद्रित करणे त्यांना जमले नाही. पण लेखनास उभारी आली. शारीरिकदृष्ट्या ते सावरत गेले.

या नंतरच्या 'गांधीजी : मानव नि महामानव' या प्रयोगाच्या वेळी डॉ. गोखले यांची प्रकृती तुलनेने अधिक स्थिर होती. तेव्हा अभ्यास करणे जमत होते. गांधीजींच्या व्यक्तित्वाचे विश्लेषण करून त्याचे गौण प्राधान्यत्व गोखले यांनी निश्चित केले होते. अधिक

महत्त्वाच्या घटकांना प्राधान्य देत त्यांनी व्यक्तिविमर्शाचे लेखन केले. एक व्यक्तिविमर्शक म्हणून मनात आलेल्या 'आदर्शा'च्या तुलनेत स्वत:च्या मर्यादा ते जाणून होते. गांधीजींच्या व्यक्तित्वातील काही भाग आकलनाच्या दृष्टीने आकलनाच्या मर्यादांच्या बाहेर असल्याचे लक्षात येताच त्यांनी त्या लेखनाच्या वेळी त्या-त्या जाणकारांची मदतही घेतली होती. सर्वच अपेक्षा आपण पूर्ण करू शकत नाही या जाणिवेने आकलन स्पष्टतेपुरती ही मदत त्यांनी घेतली. स्वत:समोरचे व्यक्तित्व सुस्पष्ट करून घेतले. परिणामी गांधीजींचा व्यक्तिविमर्श अधिक चांगला लिहिला गेला. 'आदर्शा'च्या त्यांच्या कल्पनांच्या खूपच जवळ जात उत्तम आणि विशुद्ध रूपात शब्दांकित झाला. याच ग्रंथातल्या प्रस्तावनेत त्यांनी 'व्यक्तिविमर्शा'च्या नव्या वाङ्मय प्रकाराचे स्वत:ला जाणवलेले सैद्धांतिक रूपही साधार-सप्रमाण मांडले. आणि अभ्यासकांसाठी एक नवे दालन उघडले.

स्वत:च्या तिसऱ्या आणिअखेरच्या व्यक्तिविमर्शाचे मुद्रित रूप डॉ. गोखले पाहू शकले नाहीत. यात त्यांनी चरित्राचीच काळानुसारी निवेदन पद्धती शब्दांकनासाठी स्वीकारली. व्यक्तित्वाचे एकेक अंग वा अंगांचा समूह विवेचनासाठी न घेता कालानुसारी निवेदनातूनच संपूर्ण व्यक्तित्व रेखाटण्याचा काहीसा अवघड प्रयोग त्यांनी केला. त्यातही व्यक्तित्वावर लक्ष केंद्रित करत ते लिहीत गेले. डॉ. आंबेडकरांच्या त्या-त्या परिस्थितीतल्या प्रासंगिक विचारांतील चंचल भाव-भावनांतल्या संगती-विसंगतींसह उद्रेकांची कल्पना ध्यानी ठेवत त्यांच्या व्यक्तित्वाचा शोध घेताना करावयाची वैचारिक मांडणी डॉ. गोखल्यांना काही वेळा कठीण गेली असावी असे वाचकांना जाणवते. राजकीय समीकरणांच्या सतत बदलत्या रूपांतून विचार व त्यातून व्यक्तित्वाचे अस्पष्टपणे जाणवणारे घटक, त्यातील सत्यांशांसह शोधतानाची ही अडचण होती. याच ग्रंथातल्या प्रस्तावनेतून डॉ. गोखले यांनी व्यक्तिविमर्शाच्या वाचकांच्या संदर्भात काही अपेक्षा व्यक्त केल्या आहेत. त्यांच्या विचारांची उंची लेखकापर्यंत वाढवायची ही शिफारस करताना ते म्हणतात की, चरित्रनायकाएवढे व्यक्तिविमर्शकाने आणि वाचकानेही उंच होत त्यातील (व्यक्तिविमर्शातील) सूक्ष्म, अवघड विचार समजून घेण्यासाठी स्वत:ची ग्रहणशक्ती वाढवावी.

चरित्राचे सूक्ष्म अवलोकन करता करता डॉ. गोखले यांनी 'व्यक्तिविमर्शा'चा नवचरित्राच्या लेखनाचा सिद्धांत आपल्यापरीने मांडला. त्याला नव्या वेगळ्या वाङ्मयप्रकाराचा दर्जा दिला जावा असे सुचवले. या नव वाङ्मय प्रकारातले तीन प्रयोगही केले. तेव्हा एक व्यक्तिविमर्शक-मराठीचा पहिला व्यक्तिविमर्शक म्हणून डॉ. गोखले यांचे स्थान महत्त्वाचे आहे. यातून व्यक्तित्वाच्या विचारांचा सूक्ष्म अभ्यास व त्याची नवी लेखनपद्धतीही दिली. हा प्रयोग मराठीत नवा वाटला, तरी तो सतत उपयोजनात येऊन रुजायला हवा आणि वाङ्मयप्रकार म्हणून विकसित व्हायला हवा. 'व्यक्तिविमर्श' या नव्या वाङ्मयप्रकाराचे जनक या नात्याने डॉ. द.न. गोखले यांचा अभ्यास व हे प्रयोग मराठी चरित्रवाङ्मयाचे अभ्यासक आणि जाणकार रसिक वाचक नक्कीच स्मरतील एवढे नक्की.

❖❖❖

**जयंत वष्ट**
९, कमलकुंज, सवितानंद सोसायटी
आनंदनगर, सिंहगड रोड पुणे ५१
फोन. ९८९०८७६१५४)

# मर्ढेकरांच्या कवितेतील चिन्ह - लिपी

– अरविंद हसमनीस

*[मर्ढेकरी कविता तंत्रवादी आहे ह्या प्रश्नाची उकल करताना चिन्ह-लिपीची चर्चा केली आहे. विरामचिन्हे ही केवळ व्याकरणिक संज्ञेपुरती मर्यादित नाहीत. शब्दांमध्ये असलेल्या अवकाशातील, भावरम्यता प्रकट करणारी, अर्थभावाशी आणि स्वरभावाशी निगडित असलेल्या संवेदना प्रकट करणारी, तांत्रिक आयुधे आहेत. वृत्त आणि अलंकार हेही रचनातंत्रच आहे. परंतु विरामचिन्हे किंवा चतुष्पदीसारखी मांडणी केवळ रचनाबंध न राहता, अर्थाची तरलता प्रकट करणारे तंत्रच आहे. कवितेने तंत्राला शरण जावे की अर्थाला शरण जावे, अशा प्रश्नात न राहता, शब्दांच्या अवकाशाला भिडावे; आणि शब्द-रचनेच्या पलीकडच्या भावरम्यतेला प्रकट करावे. विरामचिन्हांचा आणि रचनाबंधाचा एक नवा विचार यातून प्रकट केला आहे. –संपादक]*

आकलनाही आधी मानवी जिज्ञासेला जीवनात अत्यंत महत्त्व असते. कलावंताचे तर ते संवेदनशील अंग असते. रसिकांच्या आकलनक्षेत्राचा, जिज्ञासाही पाया असतो. जिज्ञासेमुळेच रसिकांच्या वाङ्मयीन अपेक्षांना बहर येत असतो. मग जुन्या 'औदुंबर' वृक्षाला पुनः-पुन्हा पालवी फुटताना दिसते. त्या नवोदित पालवीच्या वैभवाचे गूज़ जिज्ञासेला नव्याने आवाहन करते, तेव्हा तिच्या उमलण्यातील तत्वांचा शोध घेण्यास मन उचल खाते. एकीकडे जगण्यातील अशा कलात्मक, अंगभूत उत्कर्षणात जीवनाचे गूज दडलेले असते. तर दुसरीकडे अशा उमलातून होणारा तंत्राविष्कारही सजगाला दार्शनिक होत असतो, तेव्हा त्याला त्याची जाणीवच फक्त होत असते. जिज्ञासेमुळेच तो त्या तंत्राच्या रूपात होणारा जीवनाविष्कार आकलित करून घेत असतो, म्हणूनच कलावंतांला प्रतिभेइतकाच जिज्ञासेचा स्पर्श होणे नितांत गरजेचे असते.

जिज्ञासा कितीही तीव्र असली तरी तिचे रूपांतर जाणिवेत होणे हे अत्यंत महत्त्वाचे असते, हे ज्ञान कोणत्या प्रकारचे होते यालाही महत्त्व असते. कारण जिज्ञासा ही दोन पातळ्यांवर काम करत असते.

(अ) एक : जगण्यातील अंगभूत कलात्मक उत्कर्षण वा विकास यांचे होणारे ज्ञान. (ब) दोन : अशा उत्कर्षणादरम्यान होणाऱ्या तंत्राविष्कारातील दार्शनिकाचे (तत्त्वांचे) ज्ञान. अर्थात सजग, सृजक यापैकी प्राप्त झालेल्या कोणत्याही ज्ञानाचा वापर आपल्या कलाकृतीत कलात्मकरित्याच करीत असतो. तसेच या दोनही प्रकारांतील गूज, विविध माध्यमांच्या रूपात समोर येत असते पण त्या रूप-ज्ञानाची जाण आपणास असतेच असे नाही, कारण ती सर्व रूपे नवस्वरूपात आणि दृश्यादृश्य रूपात आपल्यासमोर येत असतात, सामान्यत: त्याचे स्वरूप स्वर, वर्ण, आकार इ. प्रकारचे असते. शिवाय त्यात विविधता असतेच. त्यांचे सामान्यीकरण करणेही अवघड असते. इतकी ती स्वतंत्र व स्वयंभू असतात. अशी ती अजाण राहिल्यामुळे त्यांच्या अर्थ-संभवांची शिदोरीही अज्ञात राहाते. म्हणजे केवळ जिज्ञासा तुमच्या जाणिवांना ज्ञान-सुबळ करू शकत नाही, तर त्यांना नवसंदर्भातील अर्थ-ज्ञानही प्राप्त करून घ्यावे लागते, त्यासाठी सजग प्रयत्नांची आवश्यकता असते. उदाहरणच द्यावयाचे झाल्यास 'भाषा' या विषयाचेच घेता येईल. भाषाविषयाचे ज्ञान लेखकाच्या निर्मितीला सफल करत असते. तरीही तो आपल्या माध्यमाविषयी पूर्ण ज्ञानी आहे; असा विश्वास देऊ शकत नाही, एवढेच नव्हे

तर त्यातील विरामचिन्हांची जाण त्यास पूर्णत्वाने असते असेही नाही. वास्तविक भाषेतील विरामचिन्हांची उपस्थिती त्या मोकळ्या जागेला 'पोटुशी' करीत असते. तरीही त्या स्वल्पचिन्हाकाराच्या या मुद्द्याला आपण जाणू इच्छित नाही. त्यातील चिन्हाकारालाच आपण कुरवाळीत असतो, तेही अर्थ गर्भाला वगळून, कारण त्याच्या भावार्थाच्या कंपनांची सहज जाण आपणास नसते; आणि ते ज्ञान करून घेण्याबाबतीतही आपण बेफिकीर असतो. त्या भावार्थ कंपनींचे ज्ञान प्राप्त करून घेण्याचेही एक स्वर-तंत्र असते. त्याच्या अर्थ-उमजाचे कर्ज नजरेलाच असावे लागतात. ती उमज नजरेस प्राप्त झाली की त्यातील अर्थ-गर्भाला त्या जाणिवेने नवनवे अवयव फुटताना दिसू लागतात. त्यांना न्याहाळण्यानेही नितांत सुंदर अनुभव मिळत असतो. या सर्व गोष्टींची न्यूनता, एका चिन्हाच्या अर्थ-जाणिवेच्या अज्ञानाने कलाकृतीच्या स्तराला कमजोर करीत असते. हे सृजकास कळावयास हवे. या दृष्टीने मर्ढेकरांनी चिन्हांचा खूप मूलगामी विचार केलेला आहे; असे दिसून येते. तसा तो करणे म्हणजेही आपल्या जाणिवांना अधिक स-ज्ञान व प्रगल्भ करणे असेच ठरते.

येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, सृजकांच्या जाणिवेचे व्यवहार कोणत्या गुण-सूत्राधारे, म्हणजेच ज्ञान प्राप्तीकर्म क्रियेवर कार्यरत असतात. (वरील (अ) वा (ब) सूत्राधारे) त्यावर सृजकाची वैचारिक बैठक वा त्याचा पिंड-धर्म पोसला जात असतो. त्यानुसार तो कलावादी, तंत्रवादी वा जीवनवादी इ. ठरत असते. याचाच अर्थ त्याच्या जाणिवांचा कल कोणत्या ज्ञान पद्धतीवर (अ-वा-ब) निर्भर आहे तेही त्यावर ठरत असते आणि त्यावरच त्याच्या आकलनक्षमतेची दिशाही ठरत असते.

आपल्या जाणिवांचा 'घेर' कितीसा असतो? अर्थात ज्ञात संबंधातील ज्ञान-परिघालाच आपण अजाणता जाणिवेचा-परिघ ठरवीत असतो. शिवाय आपल्या प्राथमिक क्रमिक घोकंपट्टीचा 'वार' त्या जाणिवांच्या --- कनातीला आपण घालीत असतो. त्यानेही जाणिवांच्या व्रात्य छटांना कनात वर करून आत डोकावण्यासही आपण मज्जाव करीत असतो. शिवाय आपल्या अशा कृत्याने जाणिवांतील आतुर-अर्थ-गर्भ-संभवाची भ्रूणहत्या आपण करीत असतो. हे ज्ञान वा याची जाण आपणास कशासाठी हवी असते? ज्ञानाच्या आधारे अ-ज्ञानातील संबंध-सूत्रांचा पडताळा पाहणे हा तर जाणिवेचा मूलाधार असतो. तो पडताळा जितका अचूक व आनंददायी, तितका जाणिवेचा परिघ दीर्घ. अ-ज्ञातातील ज्ञानानेच जाणिवेतील प्रगल्भता अधिक प्रकाशमान होते. ती प्रगल्भता ज्ञान-जाणिवेने आनंददायी होतेच, शिवाय दीप्तीने मार्गदायीही होते. त्याने सजग, अधिक ज्ञानी नि तल्लख होतात. अन्यथा व्यावहारिक तारतम्य म्हणजेही जाणिवांचा 'प्रफुल्ल-डेटा (तंबू) ठरतो आणि व्यवहारी, चुणचुणीत, चतुर माणूस वेळप्रसंगी वेळेला चुण्या घालून नखरेल चुणूक दाखवितोच. पण ती चतुराई म्हणजे काही मानवी जाणिवांची प्रगल्भता नव्हे, ही ही जाण सृजकाला त्यामुळे येत असते.

भाषेतील चिन्हेही त्या-त्या काळाच्या चुन्यासारखीच असतात. फक्त त्या मळलेल्या (रूढ) आहेत की जाणीवपूर्वक चुण्यांच्या भार्गवाने मूर्तास सौंदर्याकार निर्मिलेला आहे, हे जाणकारालाच ज्ञात होत असते. त्यातूनच ते (जाणकार) भाषेतील सौंदर्य सौहार्दाचा गंधाकार उलगडीत असतात. वास्तविक विरामचिन्हे ही शब्दांच्या अधरी, अर्धउदरी वा सामोरी, अर्थ गंधाला उद्धरीत असतात असा माझा आणि आपलाही समज असतो. त्याने कलाकृतीला आशय-सौंदर्य

प्राप्त होत असते; आणि त्या जाणिवेने जीवन आनंददायी होत असते. हाही आपला सामान्य अनुभव असतो. पण जिज्ञासा, तिचे दुहेरी कार्य, त्याचे जाणिवेत होणारे रूपांतर, ज्ञानातील परिवर्तन, त्यातून येणारी प्रगल्भता आणि सृजनाला होणारी त्याची उपयुक्तता या सर्व पार्श्वभूमीवर आपण मर्ढेकरांच्या चिन्ह वापराच्या प्रयोगांचा विचार करणार आहोत.

मुख्यत: विराम-चिन्हे ही एकसंधातील न्यूनतम, अर्धतम वा पूर्णतम, त्सेक, उत्सेकाचे भाव बिंबवीत असतात. विशेषत: मुख्य भावाशयातील द्रेकाला आणि उद्रेकाला ती संधान ठरत असतात. विरामानंतरच्या भाव-भागाचे ते विधायक बंधन ठरतात. एक संधाशयाला ती अदृष्य स्वर भावाने सख्य-बंध होत असतात. त्यास एकाकार प्राप्त करून देत असतात.

एकाधिशयाला तेच भाव-गंध प्राप्त करून देत असतात. कारण त्सेक, उत्सेकांचा बीज - कोष हा त्याच्या स्वभावोक्त उद्रेकाचा पाया असतो. (प्रेमाने) रागावलेला माणूसही, त्यातील त्येसक, त्सेका समवेत हातवारे करीत तुटक-तुटक शब्दोच्चार करतो; श्वास, अपसारणासारखा शब्द बाजूस काढून आपला भाव प्रकट करीत असतो. त्या मोकळ्या जागेत चिन्हे विराजित असतात. तेव्हा मनुष्य सुसंस्कारित असतो. त्यात वियोगाचा अथवा पराभवाचा वा हतबलतेचा भाव असतो. ती पोकळी नि ते चिन्ह त्या अर्थ-भाव-गंधाने आणि त्या स्वर-भाव-गंधाने भारीत असते. त्यानेच ते-ते भाव उत्सेकित होत असतात.

'सांभाळून राहा!' असे म्हणत तो (उत्सेक) उद्गार चिन्हासारखा हात उंचावून आपली हताशा हलवीत असतो. 'आता काय करायचे?' 'आलिया भोगासी' असा भाव पेरीत आपला जीव, प्रश्नचिन्हासारखा फासला लावीत तो उभा असतो. मानवाच्या रडण्याच्याही किती तऱ्हा असतात. त्याचे स्वरही त्यास अनुसरून उद्रेकित होत असतात. त्याने जे प्रश्न उभे राहातात, त्या प्रश्नचिन्हाला सुद्धा त्या-त्या प्रासंगिक घटनेच्या स्वराचा मेळ त्याला असतो. हे जाणण्याचे काम जिज्ञासेद्वारेच करावयाचे असते. बाळाच्या रडण्याला किती स्वर असतात? झोपेत सटवाई रडवते तो क्लेश-भाव, स्वर वेगळा असतो. मुंगी चावल्याने त्याला वेदना स्वरयुक्त भाव असतो. भूक कुळकुळण्यात व्याकुळ स्वर असतो. अनोळखी हाताच्या स्पर्शाने होणाऱ्या अजाणतेचा भय-स्वरूप स्वर त्यात असतो. **आपणाला प्रश्न पडतो त्या प्रश्नचिन्हाला इतके आकार असतात आणि तितकेच त्याचे स्वरही भिन्न असतात.** पण मातेला त्या-त्या प्रश्नाचे स्वरोत्तर बरोबर ज्ञात असते. अश्रू आनंदाचे असतात, विरहाचे वा कायम ताटातुटीचेही असतात. कधी कधी ते आगंतुक वा मूकही असू शकतात. त्या प्रत्येकाला त्याचा असा भाव असतो स्वर असतो, तोच स्वर नि भाव त्या-त्या चिन्हांचा असतो. त्याचे अर्थबंध ज्ञात असणे असेच महत्त्वाचे असते आणि ते महत्प्रयासी असते. यासाठी जिज्ञासा तीव्र आणि तीक्ष्ण असावी लागते.

जिज्ञासेचे जाणिवेत व तेथून जाणण्यात म्हणजे ज्ञानात रूपांतर करण्याचे प्रयास कलावंतासच करावयाचे असतात, कारण ज्ञानाचा, ज्ञानाच्या परिघावरच, प्रतिभेचा प्रपंच वाढत असतो. तरच कवितेतील त्यांचे (चिन्हांचे) धुमारे अर्थाशयाबरोबरच त्यांच्या गंध-गहिरांना उलगडता येतात. हे चिन्हाच्या अंका आकाराआशयाबाबत झाले. या बरोबरच त्यांच्या **स्वराशयाची संवेदनशीलता कलावंतास हवी, आणि ती संवेदना ताल, लय आणि ठेका**

**यांच्याशी निगडित असते, याचीही जाण त्यास हवी.**

अशाप्रकारे विरामचिन्हांचा संबंध एकसंधातील (गद्यात एका वाक्यातील पद्यात ओळीतील अर्थबंधाशी निगडित) अर्थ-भावाशी आणि स्वर भावाशी निगडित असतो; हे मान्य करावे लागते. कारण **भाव... भावना... तरलता ही काव्याची मूलद्रव्ये आहेत असे मी मानतो.** हे मूल्यघटक संवेदनेशी निगडित असतात. यामुळेच कोमलता, रमणीयता म्हणजेच सौंदर्यवत्ता आणि सूक्ष्मी-संदिग्धता याचा प्रत्यय तेथे येतो. **चिन्हांच्या उपस्थितीने भावनांच्या स्पंदनांचा ताल/लय प्रवाही राहातो,** त्याने आशय प्रवाही होतो नि त्या सजीवत्व प्राप्त होते. त्याचे कारण त्या धमन्यातील झडपांचे कार्यही चिन्हे करत असतात.

पण मर्ढेकरांनी या भावनिक आवाहनाला आणि आविष्काराला छेद देत कवितेतही विचाराला प्राधान्य देता येते आणि त्याच्या उत्कर्षाला उच्चतम पातळीवर नेता येते हे आपल्या कवितांतून दाखवून दिले आहे आणि त्यासाठी त्यांनी काही प्रयोग केलेले दिसून येतात. त्यात प्रस्थापित वृत्तांचा, गण-मात्रांचा नव्या तंत्राधारे केलेला वापर, त्यासाठी पूर्वनियोजित आशय-विषयाचे आरेखन व त्याची संयुक्तिक 'मांडणी या तंत्राचा केलेला उचित नि सफल वापर, शिवाय भाषेतील चिन्हांचा विपुल व अर्थवाही केलेला वापर इ. हेतूपूर्वक केलेल्या प्रयोगांचा त्यात प्रामुख्याने उल्लेख करता येईल. अशा प्रकारे, **वैचारिक कवितेलाही काव्यात्मक दर्जा प्राप्त करून देता येऊ शकतो नि त्याला प्रगल्भताही प्राप्त करून देऊ शकतो** असा त्यांचा ठाम विचार होता. हेच त्यांच्या काव्य-लेखनावरून आणि त्यांच्या वैचारिक लेखनावरून स्पष्ट होते, म्हणूनच ते म्हणतात–

*'भंगू दे काठिण्य माझे*
*आम्ल जाऊ दे मनींचे' - (१/७२)*

असे म्हणत ते विधात्मकाला विनंती करतात ती ही चढत्या क्रमाने, धारदार शब्दांनी. मनींचे हेतू, लोभ, ईर्षा, लालसा यांचे सारे आम्ल होऊ दे, आघात आणि पोळू दे आतून तेही अतिंद्रियार्थ आचे 'यासाठी या कवितेच्या मांडणीतही एक स्पष्ट आणि जाणीवपूर्वक केलेले आरेखन आहे.' चतुष्पदींच्या अंतऱ्याची 'सलग' मांडणी उलट प्रथमपदीच्या (ध्रुवपदीच्या?) चार चरणांची 'विलग' मांडणी करून ते आपल्या आर्त मागणीला बिंबवू पाहातात. शिवाय अंतऱ्यातील विषयाला गांभीर्यही प्राप्त करून देतात, तर त्याचा आर्त पूर्व-ध्वनी प्रथमपदीतून निवेदित करतात. म्हणजे प्रथम पदीतील विलग आर्ततेला पुढील पदीतून तुझ्या कृपेचा सलग लाभ होवो अशी विनवणी ते अशा मांडणीतून करताना दिसतात. मांडणीतील अशा तांत्रिक प्रयोगाचा येथे सफल वापर केलेला दिसतो. शिवाय या महिरपीत आणखी एक कुशल कुसर त्यांनी आरेखिलेली दिसून येते ती अशी.

| | |
|---|---|
| प्रथमपदी | 'आम्ल मनाचे' |
| अंतऱ्यात | ज्ञात हेतू (जे आम्ल होत) |
| प्रथमपदी | स्वातंत्र्य... उच्चारातले (जिभेशी निगडित) |
| अंतऱ्यात | लोभ जिभेचा... जळू दे |
| प्रथमपदी | 'काठिण्य' 'मी' चे.. जाऊ दे |
| अंतऱ्यात | 'इर्षेस... खांब दे! |
| प्रथमपदी | 'त्वत स्मृती - ओळखू दे' |
| अंतऱ्यात | 'आण तुझ्या लालसेची' |
| प्रथमपदी | 'धैर्य दे अन् नम्रता' |
| अंतऱ्यात | 'घेऊ दे आघात नीते' |
| प्रथमपदी | 'आशयाचा तूच स्वामी' |
| अंतऱ्यात | 'काय मागावे परी म्या' |

वैचारिक पक्व मांडणीचा मनोवेधक दादरा यातून दिसून येतो. देवघरातील आरासित-मांडणी सारखा सुलभ तरीही सुरेख आणि स्थिर तरीही सुरेल.

अशाप्रकारे मर्ढेकरांनी, चिन्हे, वैशिष्ट्यपूर्ण रचना सौष्ठव, त्याला नियोजनपूर्ण आशय-मांडणीची जोड त्यातील सलग-विलगाधारे निर्माण होणारी पोकळी यांचा तांत्रिकदृष्ट्या वापर करून भावना व भावमूल्यांना छेद दिला आहे तरीही ती कविता 'काव्य' म्हणून परिणामकारक झालेली आहे असेच म्हणावे लागेल.

भावनात्मक आवाहन, भावविवशता आणि भाव कच्छपि जाण्याने काही वेळ कवितेचा स्तर उंचावतो, असे असले तरी वैचारिक प्रगल्भ आवाहनाने आणि विचारपूर्वक आरेखन-मांडणीने म्हणजे तंत्रांच्या वापराने बुद्धीला आवाहित केल्यासही कवितेचा स्तर तितक्याच उंचीवर नेता येतो, असे काही मर्ढेकरांना आपल्या कविता लेखनातून सूचित करावयाचे नाही ना? असाही प्रश्न त्यांच्या कविता वाचता-अभ्यासिता जाणवत राहातो.

जो विचार त्यांच्या वैचारिक-आरेखन तंत्राविषयीचा आहे; तसाच तो चिन्ह-लिपी वापराविषयीही आहे. मर्ढेकरांच्या कवितेतील विराम-चिन्हे ही गंधचिन्हे म्हणून तिथे उपस्थित नसतात. तर वर्णावलीतील आकृतिबंधात अडसरलेला अर्थ या चिन्ह-लिपींच्या संगिनींनी ते (मर्ढेकर) मुक्त करू पाहाताना दिसतात आणि त्यातील आशयाला अधिक तीक्ष्ण-उजळ करू पाहातात; त्यामुळे मला असे वाटते की, मर्ढेकर आपल्या कवितेतील शब्द संहितेइतकेच किंबहुना काकणभर अधिकच, तिच्यातील **विविध विरामचिन्हे लिपीने अर्थाला अधिक प्रकाशित, प्रभावित आणि प्रगल्भ करताना दिसतात.** म्हणून त्यांची कविता वाचताना, चिन्हांना वाचावयास शिकणे, त्यांचे अर्थोद्गार समजून घेणे अधिक निकडीचे ठरते. ते जाणण्याने त्यांची कविता प्रत्यक्षात जाणवते त्याहीपेक्षा ती अधिक अर्थ-गर्भी, प्रगल्भ-परिघी आणि तेजस्वी आहे. याचे आकलन होते. जाणिवांच्या परिघाबाबत, तिच्या कार्याबाबत आणि माध्यमाबाबत, सुरुवातीस मी जे विवेचिले आहे ते याच संदर्भाने होय. साधारणत: विरामचिन्हेच आहेत असे म्हणून जे आपण दुर्लक्षितो आणि आपल्या जाणिवेच्या परिघाला संकुचित करू पाहातो त्याने मर्ढेकरांच्या कवितेतील एका अनाहूत नि अकल्पित अशा सौंदर्यानुभवाच्या आनंदाला आपण पारखे होतो, जो मर्ढेकरांनी चिन्हलिपीद्वारे तेथे जाणीवपूर्वक नोंदविलेला आहे.

मराठी कवितेत मर्ढेकरांइतका जाणीवपूर्वक चिन्ह-लिपीचा वापर अन्य कोणी केलेला दिसून येत नाही. शिवाय कवितेत चिन्ह-लिपीला खऱ्या अर्थाने त्यांनीच प्रतिष्ठा मिळवून दिली असेच म्हणावे लागेल; परंतु त्याकडे म्हणावे तसे लक्ष ना रसिकांचे गेलेले दिसून येते, ना विचारी समीक्षकांचे असेच म्हणावे लागेल. विशेषत: प्रश्नचिन्हांचा अर्थाघाती वापर जसा त्यांनी केलेला आहे तसा तो इतरत्र क्वचितच दिसून येतो. केशवसुतांचा 'आम्ही कोण?' हा सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी प्रश्नही तितकाच क्रांतदर्शी आहे, हे खरेच. पण

*'सूर कशाचे वातावरणी? सळसळ पानी? वा झरणी*
*खळखळ ओहोटीचे पाणी?*
*किलबिल शिशिरी केविलवाणी?*
*कुणास ठाऊक!....*

येथे ओळीगणिक विविधार्थी प्रश्नचिन्हे उभी करून 'कुणास ठाऊक! या भाबड्या सरलोद्गारापुढे उद्‌गारचिन्ह उभे करून मर्ढेकरांनी त्या शब्दाच्या मुठीत 'कट्यार' दिलेली आहे. जी भयचकित रसिक चित्ताचाच छेद करू पाहाते; आणि तसा तो अनुभवासही येतो. शिवाय या आठ ओळींच्या कवितेत मर्ढेकरांनी तब्बल १२ (बारा) विविध विरामचिन्हांचा वापर

केलेला दिसून येतो. त्यातही केवळ मर्ढेकरांच्या पूर्वनियोजित मांडणी-आरेखनाच्या तंत्रामुळेच त्यातील प्रश्नचिन्हांना अधिक सुलभतेने गर्भितार्थ प्राप्त होताहेत असे मला जाणवते. अन्यथा चिन्हांचे वैय्याकरणी अर्थच फक्त उद्घोषित वा दृश्यमान होताना दिसतात आणि वाचकही तेवढाच त्याचा अर्थ गृहीत धरीत असतो.

कवितेच्या ओळीपेक्षा चिन्हांचा अधिक वापर केलेल्या कविता त्यांच्या संग्रहात सर्रास दिसून येतात. कवितेच्या अर्थ-गर्भितेसाठी बाह्य तांत्रिक आयुधांचा वापर करावा लागला तरी तो योजावा असे काही मर्ढेकरांना यातून सुचवावयाचे नाही ना? असाही प्रश्न मनात आल्याशिवाय राहात नाही.

दुसरे : जेव्हा जेव्हा आपण 'जीवनाचा' विचार करीत असतो, त्यावेळी अजाणतेपणी आपण कालाचाच विचार करीत असतो. कालाला स्वत:चा असा एक अंगभूत ताल, लय आणि ठेका असतो. हाच ताल, लय आणि ठेका कालाची शुद्धाशुद्धता ठरवीत असतो. ते कालाचे वैय्याकरणच असते. त्यामुळेच सजिवांच्या सृजनातही हा ताल, लय, आणि ठेका निबद्ध झालेला दिसतो.

कलाकृतीच्या सौंदर्यातील तोही एक गूजप्रवाह असतो. ते सारे अतीत असले, तरीही त्याचा अनुभव संवेदनशील सृजकास येत असतो, त्यामुळेच **सृजनाला तालाशयाची प्रगल्भता प्राप्त होत असते. जी शब्दांत पकडणे सहज शक्य नसते.** त्यासाठी अन्य माध्यमांचा वा तंत्राचा वापर करणे इष्ट ठरते. मर्ढेकरांनी याचे मोल जाणले होते म्हणून त्यांनी चिन्ह या प्रतीकांचा तांत्रिक आयुध म्हणून वापर केला आणि आशयाला तालही मिळवून देण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे त्यांच्या काव्यातील अंतस्त प्रवाह-नाडीच्या तालाचा तोल सांभाळला गेला आहे. हेही ते जाणीत होते. चिन्हांना अर्थ भार नि स्वरभारांनी मंडित करता येते. तसेच तालाशयाचा भार देववून आशयाला प्रगल्भ आणि तीक्ष्ण उजळ करता येऊ शकते; हे त्यांनी आपल्या कवितांतून सिद्ध केले आहे असे म्हणावे लागेल. तरीही शब्दांवरील त्यांचे प्रभुत्व मांडणीतील मातवरी आणि चिन्हांचा जाणिवपूर्वक केलेला सर्रास वापर, याने त्यांची कविता म्हणजे फुलांनी लगडलेली डहाळी न राहाता २६ जानेवारीच्या राजपथावरील सैनिकांच्या सशस्त्र कवायतीसारखी ती भासते. तिच्यात एक क्रमवारी असते, शिस्त असतेच, शिवाय तिला एक ताल असतो, लय असते आणि ठेकाही असतो, शिवाय शस्त्राप्रमाणे तळपती विरामचिन्हांची अंदाजीही असते आणि हा सारा जाणीवपूर्वक केलेल्या पूर्वनियोजित वैचारिक साधनेचा (तालमीचा) तो परिपाक आहे याची जाणीवही त्यांची कविता वाचताना सतत जागी राहाते.

अशाप्रकारे या समीक्षक, विचारवंत मर्ढेकरांच्या मूलस्थ-पीठाचा ठोस परिणाम त्यांच्यातील कवीवर झालेला दिसून येतो, हे त्यांच्या कविता अनुभवताना जाणवते. तरीही मराठी काव्यप्रवाहात मर्ढेकरी कविता ही सौंदर्यवादी कविता आहे की तंत्रवादी आहे, या दृष्टीने तिची फेरमीमांसा व्हावी असे मला वाटते.

◇◇◇

**अरविंद हसमनीस**
C/o, प्रा. डॉ. मधुकर हसमनीस
'सावली' गणेश मंदिर नजीक
इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली
पिन ४१५४०९
मोबा. ७७०९६७७२८८

# महाराष्ट्रातील आदिवासी बोलीभाषा

– डॉ. पुष्पा यशवंत गावित

*[महाराष्ट्रातील आदिवासी बोलीचा आढावा घेताना डॉ. पुष्पा गावित यांनी ऋग्वेदकालापासून आपले विविध आविष्कार दाखविणाऱ्या गोंडी बोलीचा वैशिष्ट्यपूर्ण परिचय करून दिला आहे. मराठी, कन्नडादी भाषेच्या जडणघडणीत गोंडीचा पायाभूत सहभाग असणे शक्य आहे. गोंडी, भिल्ली, वारली, कोरकू, पावरी ह्या भाषांचा संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, यादवकालीन तंजावरी, हिंदी, गुजराती, बंगाली, मराठी, कोकणीशी असलेली समृद्ध परंपरेचा त्यांनी मागोवा घेतला आहे. बोलीभाषा, केवळ भाषिक अस्मितेच्या अभावाने आणि आदिवासींच्या बदलत्या जीवनशैलीने, समजुतीने लयास जाऊ नये; ह्या तळमळीतून केलेला हा अभ्यास! –संपादक]*

पीएच.डी. च्या अभ्यासाकरिता 'धुळे जिल्ह्यातील आदिवासी बोलीभाषांचा तौलनिक अभ्यास' काही प्रमुख बोलींच्या संदर्भात (भिल्ली, पावरी, गावची, वडोवळणी आणि कोटली) या विषयाची निवड केली. आई-वडिलांच्या प्रेरणेने रूढ मार्गावर जाण्यापेक्षा वेगळी वाट चोखाळण्याचा आत्मविश्वास असल्याने हा विषय निवडला आणि एकलव्याप्रमाणे स्वत:च गुरू, स्वत:च विद्यार्थी आणि संशोधक अशा भूमिका पार पाडण्यास सिद्ध झाले. आमच्या विद्यार्थिनी सभेचे सेक्रेटरी मा.य.वैद्य जे वयाच्या ८२ व्या वर्षी पीएच.डी. झाले; त्यांनी माझ्या विषय निवडीचे कौतुक केले. माझे वडील मला म्हणाले, 'आपला अभ्यास करण्यास कुणी पुढे येणार नाही आपले स्थान आपली अस्मिता जपायची असेल, तर आपणच आपले नेतृत्व करावे' आणि अध्यापनाच्या क्षेत्रात आल्यावर मला हे प्रकर्षाने जाणवत गेले. शिकत असतानाच अनेक व्यक्ती मला तू आदिवासी आहेस, तू भिल्ल आहेस. तुझी भाषा आमच्यासारखी नाही याची जाणीव करून देत होते. ही जाणीव पुढे वेदना देणारी ठरली आणि या तीव्र वेदनेतून आपली भाषिक अस्मिता आणि अहंकार दोन्हीही जागृत झाले. या वेदनायुक्त अहंकारातूनच आपली मातृभाषा आणि तिच्या भाषाभगिनींचा अभ्यास करण्याचे स्फुल्लिंग पेटले.

गेल्या दोन महिन्यांपासून आपण डॉ. गणेश देवींच्या 'भारतीय भाषांची लोकगणना' वा 'भारतीय भाषांचे लोक सर्वेक्षण' याची चर्चा करतो आहोत. प्रत्येक व्यक्तीला, समूहाला स्वत:ची भाषा आहे. आपण आपला भारत देश विविधतेने नटलेला असूनही अनेकतेत एकता आहे असे म्हणतो. विविध धर्म, जाती-जमाती, पंथ, संप्रदाय, आचार विचार, वेशभूषा यांतील भिन्नतेबरोबरच भाषिक भिन्नताही आहे. याकडे आपले थोडेसे दुर्लक्ष होते. आपल्या देशातील हे भाषिक ऐश्वर्य यापूर्वी सर जी.ए. ग्रियर्सन यांनी 'लिंग्विंस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या १९ खंडांच्या पाहणीतून दाखवून दिले. १८७३ साली इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्ये दाखल झालेल्या सर जी.ए. ग्रियर्सन यांच्या नेतृत्वाखाली १८९८ ते १९०२ या काळात 'भारतीय भाषिक पाहणीचे' प्रमुख काम सुरू झाले. १९२७ पर्यंत हे काम चालले. माझ्या पीएच.डी. च्या प्रबंधाचे काम सुरू असताना मला कै. डॉ. मा. य. वैद्य यांनी ग्रियर्सन यांचे खंड उपलब्ध करून दिले. त्यावेळी त्या ९ व्या खंडातील आदिवासी बोलीभाषांची नावे सुद्धा मला माहीत नव्हती. हा आदिवासी बोलीभाषांचा खजिना सापडल्यावर स्वाभाविकपणे मला माझ्या संशोधनकामाचा हुरूप आला आणि आपल्या विषयनिवडीचा स्वत:लाच अभिमान वाटला. महाराष्ट्रात वास्तव्यास असलेल्या ४७ आदिवासी जमाती आणि त्यांच्या सुमारे ८०

बोलीभाषा त्यापैकी डॉ. गणेशदेवी यांच्या 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' या प्रकल्पाच्या महाराष्ट्र राज्य या खंडात २३ भाषांचा समावेश झाला आहे. संपूर्ण भारतातील ७८० भाषा आणि ६६ लिपी त्यांनी आपल्या या प्रकल्पातून नोंदविल्या आहेत.

खानदेशात सुमारे १७ आदिवासी जमाती असून, त्यांच्या २० बोलीभाषा आहेत. त्यापैकी अवघ्या चार बोलीभाषा समाविष्ट करण्यात डॉ. देवी यांना यश आले. भारतीय राज्यघटनेत ज्या २२ भाषांना अधिकृत भाषेचा दर्जा देण्यात आला आहे, त्यात भारतातील अवघ्या दोन संयाली व बोडो (बोरो) आदिवासी भाषा समाविष्ट लिपी झाल्या आहेत. महाराष्ट्रात मराठी आणि गोंडी या एकत्र आदिवासी बोलीला लिपी आहे. मात्र गोंडीची लिपी अलीकडच्या काळात प्रचलित नाहीत. त्यामुळे कोणत्याही बोलीभाषेतून लिहावयाचे झाल्यास देवनागरी लिपीचाच आधार घ्यावा लागतो. अलीकडे आदिवासी बोलीभाषांमधूनही साहित्य निर्माण करण्याचा प्रयत्न होतो आहे. गोंडी, भिल्ली, पावरी, कोटली या बोलीभाषांमधून कविता लिहिल्या जाताना देवनागरी लिपीच वापरली जाते आहे. पण हे साहित्य लिहिण्यापूर्वी आणि ते रसिक वाचकांपर्यंत पोहोचवण्याकरिता त्यांना समजून घेता यावे याकरिता या बोलीभाषांचे स्वरूप, बोलींची प्राचीनता, ध्वनिव्यवस्था, बोलीभाषांवर इतर भाषांचा वा इतर भाषांमधील बोलीभाषेतील शब्दांचे साधर्म्य समजून घेणे आवश्यक आहे. डॉ. गणेश देवी 'या भाषा, बोलीभाषा भारताचे आर्थिक भांडवल ठरू शकतात.' असे विधान करतात; तेव्हा निश्चितच या बोलीभाषा समजून घेण्याशिवाय दुसरा पर्याय राहात नाही.

भारतच काय, महाराष्ट्रातही आदिवासी जमातीचे वास्तव्य विखुरलेल्या स्वरूपात आहे. या जमाती हिंदूच्या समाजव्यवस्थेतून आणि जातिधर्माच्या चौकटीतून अनुल्लेखित राहिल्या. कारण या आदिवासी जमाती स्वयंपूर्ण राहिल्या आहेत. 'पहाड-पर्वत, वनराई' यातच त्यांचे वास्तव्य असल्याने या जंगलसंपत्तीच्या वळावर त्या स्वावलंवीही राहिल्या. त्यांच्या बोलीभाषाही स्वतंत्र आणि वैशिष्ट्यपूर्ण राहिल्या आहेत. त्यांचे आपापसांतील दळण-वळण त्यांच्या मातृभाषेतून होते! मर्यादित शब्दसंपदा असली, तरी ते संपन्न जीवन जगतात. त्यांच्या बोलीभाषांमध्ये विविधता आहे. मात्र या भाषांना लेखनव्यवस्था नाही. या बोलीभाषा कधी लिहिल्याच गेल्या नाहीत. पण हा अलिखित भाषिक दुसऱ्याच भाषांत साक्षर असू शकतो. जसे महाराष्ट्रातील सर्व आदिवासी जमाती मराठी भाषा लिहू शकतात. वाचू शकतात, गुजरातमधील आदिवासी गुजराती भाषा बोलतात. लिहितात, वाचतात. सांगण्याचे तात्पर्य हे की, त्या-त्या प्रांतातील आदिवासी जमातींच्या मातृभाषा, त्यांच्या स्वबोलीभाषा अलिखित असल्या, तरी ज्या राज्यात त्यांचे वास्तव्य आहे त्या राज्याची भाषा हीच त्यांच्या शिक्षणाची भाषा असते. त्यामुळे आदिवासी व्यक्ती किमान् चार भाषा जाणतो. पहिली ही जी त्याच्या स्व-समूहाच्या अंतर्गत व्यवहाराची असते. दुसरी बोलीभाषा त्या प्रदेशातील सर्व आदिवासी जमातींची समाजव्यवहाराची बोलीभाषा असते. तिसरी प्रमाणभाषा, ज्या भाषेतून ते शिक्षण घेतात आणि चौथी भाषा ते जिथे उपजीविकेसाठी जातील तिथली भाषाही ते आत्मसात करण्याचा प्रयत्न करतात. अशा बहुभाषिक आदिवासींना आपण निरक्षर म्हणू शकतो का? त्यामुळे त्यांच्या बोलीभाषा लिखित असल्या काय आणि नसल्या काय, त्यांचे काही अडत नाही. म्हणूनच या बोलींना लिपी मिळवण्याचा प्रयत्न कधी झाला नाही.

अलीकडच्या काळात २० व्या शतकाच्या उत्तरार्धात लोकसाहित्याच्या अभ्यासकांनी आदिवासी लोकगीतांच्या संकलनातून या बोलीभाषा देवनागरी लिपीतून शब्दबद्ध करण्यात आल्यामुळे आदिवासी बोलीभाषांचे स्वरूप अभ्यासकांच्या डोळ्यांसमोर आले. मात्र अभ्यासकांनी भाषाशास्त्रीयदृष्ट्या या बोलींचा

विचार केला नाही आणि आदिवासी अभ्यासकही तसे आपल्या बोलींचा भाषाशास्त्रीय अभ्यास करण्यात मागेच आहेत.

युनेस्कोच्या अहवालानुसार जगभरात सुमारे तीन हजार भाषा धोक्यात आल्या आहेत, वा मरत चालल्या आहेत. काही आदिवासी जमाती दुसरी भाषा बोलू लागले आहेत. जगातील सुमारे सहा हजार भाषांपैकी निदान अर्ध्या अधिक भाषा २०५० सालापर्यंत मृत अथवा मृतप्राय झालेल्या असतील, असे बहुतांश भाषाशास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. असे असेल तर येत्या काळात जगात खूप कमी भाषा उरतील. 'अलास्का नेटिव्ह लँग्वेज सेंटर' चे डायरेक्टर मायकेल क्राऊस म्हणतात की, सन २०१० पर्यंत जगातील ९०% भाषा एकतर लुप्त झालेल्या असतील किंवा त्या पिढीपुरत्याच त्या शिल्लक राहातील. या साऱ्या पार्श्वभूमीवर डॉ. गणेश देवी यांचा 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' हा प्रकल्प अत्यंत महत्त्वाचा ठरतो.

महाराष्ट्रात गोंड, भिल्ल, वारली, पावरी, कोकणी, मावची, कोरकू, कोलामी, कातकरी, माडिया आदी बोलीभाषा प्रमुख आहेत. त्यातही गोंडी, माडिया, भिल्ली, पावरी, मावची, वारली या बोलीभाषा महत्त्वाच्या असल्या, तरी यापैकी गोंडी व भिल्ली या बोलीभाषा अतिप्राचीन आहेत, त्या बोलींचा अभ्यास झालाच नाही. असे नाही स्वातंत्र्यपूर्व काळात सर जी.ए. ग्रियर्सन यांनी भारतीय भाषांच्या पाहणीत आदिवासी बोलीभाषांचे नमुने संकलित केले असून. सुमारे ४०० भाषा आदिवासींच्या आहेत आणि त्यांचे भाषिकदृष्ट्या चार गट केले आहेत. या गटांना भाषाकुल म्हटले आहे ते असे ऑस्ट्रिक, तिबेटी, चिनी, द्राविडी आणि इंडोयुरोपियन असे भाषाकूल आहेत. मात्र या आदिवासी बोलींना लिखित परंपरा नसल्याने एका पिढीचे किंवा समाजाचे विचार दुसऱ्या पिढीपर्यंत जसेच्या तसे पोहोचू शकत नाहीत. त्यामुळे लिखित-अलिखित अशा अंतरातील दूरतेमुळे भाषांची दुर्बोधता वाढली आहे.

गोंडी बोलीभाषा महाराष्ट्रात प्राधान्याने आणि मध्यभारतातील मोठ्या विस्तृत पट्ट्यात बोलली जाते. चंद्रपूर, गडचिरोली, नांदेड, अमरावती, नागपूर आदी जिल्ह्यांप्रमाणेच आंध्रप्रदेशाच्या सीमेलगतही गोंडी बोली बोलली जाते. तर भिल्ली बोलीभाषा गुजरात, मध्यप्रदेश, महाराष्ट्र आणि राजस्थान या चार राज्यांमध्ये बोलली जात असली, तरी त्या-त्या राज्यांच्या प्रमाणभाषेनुसार आणि आजूबाजूला बोलल्या जाणाऱ्या भाषेचा प्रभाव या बोलीवर आहे, म्हणूनच महाराष्ट्रात वास्तव्यास असलेल्या भिल्ल व इतर आदिवासी बोलीभाषांचा अंतर्भाव मराठीच्या ६५ बोली वा पोटभाषांमध्ये होतो. वारली, कातकरी, भिल्ली या बोली मराठीच्या ६५ बोलीभाषांपैकी आहेत, असे अभ्यासक म्हणतात. महाराष्ट्राप्रमाणे गुजरातमधील भिल्ली बोलींचा गुजरातीच्या २७ बोलींमध्ये समावेश होतो. भिल्ली बरोबरच घिसाडी, खोलची, गामडिया राठवा आणि चरोत्तरी इ. बोली आहेत. गुजराती, मराठी, राजस्थानी या राज्यातील एक बोली म्हणून असणाऱ्या भिल्ली बोलीच्या स्वतंत्र अशा ३६ बोली आहेत त्या भिलाली, भिलोडी, कोटली, बागडी, कातुडी, खोलची, कायली या अल्पसंख्य बोलीभाषांप्रमाणे पावरी, मावची, मथवाडी (डोंगरी भिल्ली), बर्हिभिल्ली, धानवडा, बारेला, घाटी, बोराटी, नोयरी, नहाल, आंबुडी, कोकणी आणि कोकणीच्या दोन उपबोली आदी बोलीभाषांचा समावेश होतो.

भाषा आणि बोलीभाषांच्या अभ्यासकांनी भाषांच्या विकासक्रमानुसार भारतीय आर्यभाषांचे तीन विभाग केले आहेत. १) प्राचीन भारतीय आर्यभाषा, २) मध्यभारतीय आर्यभाषा (पाली, प्राकृत आणि अपभ्रंश), ३) आधुनिक भारतीय आर्यभाषा (हिंदी, बंगाली, राजस्थानी, गुजराती, भिल्ली इ.).

महाराष्ट्रात गोंडी बोली सर्वाधिक बोलली जाते. गोंडी बोलीला लिपी असल्याचे पुरावेही अलीकडचे

अभ्यासक देत आहेत. या गोंडी बोलीभाषेचा अत्यंत बारकाईने अभ्यास करणारा जर्मन भाषातज्ज्ञ जूल ब्लॉच याने गोंडी बोलीची 'आंतरराष्ट्रीयता' शोधून काढण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या दुर्दैवी अकाली निधनामुळे ते अमोल कार्य तिथेच थांबले. द्रविडीयन भाषासमूहातील कोणत्याही भाषेची गोंडी ही अभिन्न वैशिष्ट्ये धारण करणारी एकमेव प्राचीन बोलीभाषा आहे, असे मत कॉल्डवेलने गोंडी भाषेच्या सात वैय्याकरणीय कसोट्या लावून मांडले आहे.

गोंडी बोली भाषेची प्राचीनता प्रादेशिक पातळीवर तपासून पाहिल्यास असे दिसते की, मराठी, कन्नडादी प्रादेशिक भाषांच्या जडणघडणीत गोंडी भाषेचा पायाभूत सहभाग असणे शक्य आहे. असे अभ्यासकांचे मत आहे. ऑस्ट्रेलियातील एक स्त्री अभ्यासक सूजी आँद्रेस भारतात येऊन गोंडियाना भाषेची भाषाशास्त्रीय रचना करू पाहते हे विशेष आहे. प्रधान गुरुदत्त आणि प्रा. राजेश्वरैय्या यांचे स्पष्ट मत आहे की, दक्षिण भारतात तमिळ, कन्नड, मल्याळम, तुळू या पंचद्रविड भाषा कोणत्यातरी मूळ द्रविड प्राचीन भाषेतून निर्माण झाल्या आहेत आणि गोंडी भाषाही एक मूल द्रविड भाषा आहे. कारण तिच्यात द्रविडियन भाषा विशेषांसह स्वत:ची काही विशेष लक्षणे अशी आहेत की, ती प्राचीनतादर्शक आहेत आणि ती केवळ गोंडी बोलीभाषेतच आढळतात असे द्रविडीयन भाषातज्ज्ञ डॉ. गॅन्डर्ट आणि कॉलवेल यांचे मत आहे. मात्र गोंडी भाषेच्या जाणकारांनी आणि गोंडी मातृभाषा असणाऱ्या अभ्यासकांनी या गोंडीभाषेचा अभ्यास करण्याची गरज आहे. इतर आदिवासी बोलीप्रमाणेच गोंडीचे स्वरूप अलिखित आहे, पण गोंडी भाषेची लिपी चिन्हेही आद्यअवस्थेतील आढळतात. गद्य साहित्याचा प्रवास तसा पद्यानंतरचाच आणि गोडीतील बहुतेक साहित्य पद्यरूपात आणि गेय स्वरूपात आहे.

भाषाशास्त्रीय दृष्टीने पाहिल्यास गोंडी आणि भिल्ली (भिलोरी/देहवाली) या दोनही प्राचीन बोली. भिल्ली बोलीचा उदय राजस्थानी आणि गुजराती या दोन भाषांच्या उदयाबरोबरच झाला. कालांतराने राजस्थानी गुजराती राजाश्रयामुळे आणि सांस्कृतिक विकासाच्या टप्प्यात विकसित झाल्या, त्यातून साहित्यनिर्मिती होऊ लागली. या दोन्ही भाषा लिपीबद्ध झाल्याने त्यांच्या समकालीन उदयाला आलेली भिल्ली बोली मात्र बोलरूपातच राहिली. तिची स्थिती मीरेसारखी झाली राजस्थानी, गुजराती भाषांना सांधणारा पूल म्हणून या भिल्ली बोलीभाषेचा तुलनात्मक अभ्यास होणे आवश्यक आहे असे वाटते. महाराष्ट्रातील गोंडी आणि भिल्ली बोली-भाषा शास्त्रीय दृष्टीने अभ्यास काही अभ्यासकांनी केला आहे. डॉ. एस. व्ही. देवगावकर, डॉ. पुष्पा गावित या अभ्यासकांनी या बोलींचा अभ्यास केला. या दोन्ही बोलीभाषांमध्ये स्त्रीलिंग व पुल्लींग हे दोनच प्रकार प्राधान्याने आढळतात. भिल्ली बोलीभाषेत नपुसकलिंगी शब्द असल्यास तृतीयपुरुषी सर्वनाम वापरले जाते. उदा. 'ते' च्या ऐवजी ऐपले, ऐपलो, ऐपली जसे 'ते झाड आहे' 'ऐपलो चाड आही', 'ते शेत नांगरले आहे' 'ऐपलो खेत नांगरूलो आही' असे म्हटले जाते. तर गोंडी बोलीभाषेतही स्त्रीलिंगी आणि पुल्लिंगी वचनांची प्रचुरता अधिक आहे. मराठीतील सूर्य, चंद्र, पर्वत, रेडा आदी पुल्लिंगी शब्द गोडीत स्त्रीलिंगी उच्चारले जातात. तसेच झाड, मुले, औषध, चिन्ह आदी नपुसकलिंगी शब्दही गोंडीत स्त्रीलिंगी होतात. गोंडीभाषा प्राचीनकाळी प्रगत अवस्थेत होती.

ऋग्वेदात गोंडी भाषिकांना 'मृध्रवाच' या नावाने उल्लेखित केले आहे. 'मृध्रवाच' याचा अर्थ ज्यांची भाषा अनाकलनीय आणि मुडदाड स्वरूपाची आहे असे लोक असा उल्लेख आढळतो. ऋग्वेदात वर्णन केलेले कुलितर व त्याचा पुत्र शंबर हे दस्युराजे गोंड होते. अभ्यासक आणि भाषातज्ज्ञांनी संस्कृत ही सर्वात प्राचीन आणि सर्वभाषांची जननी आहे असे



अनुक्रमणिका

मान्य केले आहे. मात्र संस्कृतपेक्षाही प्राचीन भाषा गोंडी असल्याचे पुरावे गोंडी भाषेचे अभ्यासक देतात. आदिवासी बोलींचे अभ्यासक डॉ. चॅटर्जी आणि जयनाथपाती म्हणतात, Therefore religion of the Samhita not to Anjans but to aborigines presumably the 'Dravidian KOIS' who are clearly the most important of the really inhabitants of India' यावरून संस्कृत संहिता ह्या गोंडियन लिटरेचरच्या रुपांतरीत प्रतिकृती होय असे या अभ्यासकांचे मत आहे. हे मत अधिक स्पष्ट आणि बळकट करण्यासाठी संस्कृत भाषेतील मीन, नीर, उष्ट्रम आदी शब्द गोंडीत मीन, डेस्टोर, हुटुम शब्दांशी साम्य दर्शवितात (मराठीत मासा, पाणी आणि उंट) गोंडीत 'मिणडाना' म्हणजे पसरणे पोहणे या क्रियापदापासून 'मील्ड' म्हणजे जे पसरतात, पोहतात ते 'मीण' म्हणजे मासा होय त्याच अर्थाने हा शब्द संस्कृतभाषेत आला. पण या शब्दाची व्युत्पत्ती मात्र गोंडीभाषेतील 'मिळ','मीण' शब्दाशी जुळणारी वाटते. गोंडीभाषेतील 'येर' किंवा 'डेर' म्हणजे 'पाणी' हा शब्द सुद्धा 'नीर' म्हणून संस्कृतमध्ये रूढ झाला असावा. कॉल्डवेलने सुद्धा हे शब्द संस्कृत असल्याचे नाकारले आहे. तो म्हणतो,

'Gondi has 'mina' It seems much more probable sanskrit speaking people borrowed this word from the 'Indian Aborigines' and then incorporated it in their vocabulary with other word signifying.'

संस्कृतमधील 'हेरम्बा' म्हणजे म्हैस, 'मर्कट' म्हणजे माकड 'एडवण' हे शब्द गोंडीतून आलेले आहेत असे म्हणंण्यास सबळ पुरावे आहेत. गोंड जमातीत 'ऐरमे' गोत्राचे लोक म्हशीला आपले कुलचिन्ह मानतात व ते ऐरमी असे म्हणतात. 'येर-मई' म्हणजे 'पाणी+चरते' तोच शब्द 'हेरम्बा' रूपात प्रचलित झाला. 'मर्कट' म्हणजे 'मरा' म्हणजे 'वृक्ष' आणि 'काईट' म्हणजे हात लावणे. म्हणजे 'मराकईट' झाड हाताळणे या अर्थाचा अस्सल गोंडी शब्द तयार होतो. चंद्रपूर जिल्ह्यातील राजुरा व नांदेड परिसरातील किजवट तालुक्यातील गोंडी सारखी आहे व त्यात अनेक मराठी शब्द आढळून येतात. माडिया गोंडी 'गायता पोलो' ही भामरागड (सिरोंचा तालुका) येथील माडिया गोंडी बोलतात. ही बोलीभाषा मुख्य गोंडीची एक पोटभाषा असली, तरी दुसऱ्या गोंड आदिवसींना ती समजत नाही. मात्र माडियांना गोंडी बोली भाषा समजते. अमरावती जिल्ह्यातील मोर्शी तालुक्यात जी गोंडी बोलली जाते ती 'बेतुली गोंडी' सारखी आहे, तर विदर्भातील गोंडी बोलीवर छत्तीसगडी हिंदीचा प्रभाव दिसून येतो.

कोरकू बोलीभाषेचा मुंडारी भाषागटात समावेश केला जातो. अमरावती जिल्ह्यातील मेळघाट तालुक्यातील कोरळू समूह ही बोली बोलतात. त्याचप्रमाणे नांदेड, चंद्रपूर व यवतमाळ जिल्ह्यांत कोलागी बोलीभाषा बोलली जाते. हलबी या बोलीभाषेचा समावेश मराठीच्या बोलीभाषांमध्ये केला जातो. या बोलीला 'बस्तरी मराठी' असेही एक नाव आहे.

गोंडी, भिल्ली या बोलीभाषांप्रमाणे 'वारली' जमातीचाही अभ्यास १९ व्या शतकाच्या अखेरीस काही अभ्यासकांनी केला. त्यांनी नमूद केले आहे की, वारली भाषा मराठी भाषेसारखीच आहे. सन १९५८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'हिंदुस्थानचे वंशशास्त्र' विषयक अभ्यासाच्या ग्रंथात श्री लॅथम यांनी असे म्हटले आहे की वारली लोकांची नावे मराठी सारखीच आहेत. एवढेच नव्हे, १८२२ साली प्रसिद्ध झालेल्या बॉम्बे गॅझेटिअर मध्ये पुढील उल्लेख आढळतो तो असा 'वारली लोकांची भाषा कुणबी लोकांच्या भाषेसारखीच आहे. ते नेहमी मराठी भाषा बोलतात. फक्त उत्तरेकडचे वारली लोक गुजराती भाषा बोलतात.

आपल्या 'भारतीय भाषांची पाहणी' या ग्रंथात सर जी. ए. ग्रियर्सन यांनी 'वारली लोकांची पूर्वीची



अनुक्रमणिका

बोली इतर भिल्ल व खानदेशी बोलीसारखीच असली पाहिजे. कालांतराने त्या बोलीवर मराठीचा इतका परिणाम झाला की ती बोली ठाण्याचा अंतिम उत्तर भाग 'सोडून मराठीचीच पोटभाषा म्हणावी इतकी बदलली, आणि उत्तरेकडे मात्र गुजरातीची पोटभाषा म्हणून अस्तित्वात राहिली.' १८७२ साली झालेल्या खानेसुमारीप्रमाणे ठाणे जिल्ह्यात आदिवासी म्हणता येतील अशा नऊ जमाती होत्या. त्या याप्रमाणे आग्री, कोळी, वारली, ठाकूर, कातकरी, दुबळा, वैती, कोकणा व धोडिया होय. वारली बोलीभाषेत भिल्लीबोली भाषेप्रमाणेच जोडशब्द तोडण्याची वा विस्तारीत करण्याची प्रथा आहे.

जसे प्रजा-परजा (वारली) पोरजा (भिल्ली) धारित्री - धरतरी वा. तोरती (भिल्ली) याप्रमाणे

मी मारूलो - मय मारेल (वारली) मायुप माऊचो (भिल्ली) इ.

वारलीप्रमाणेच ठाणे जिल्ह्यात जव्हार, मोरवाडा, वाडा, शहापूर, विक्रमगड आदी भागांत कातकरी या आदिवासी जमातीची संख्या अधिक आहे. या कातकऱ्यांनाच कायोडी असेही म्हणतात. सन १९०५ मध्ये रेव्ह. जॉन ॲक्ट यांनी कातकरी भाषेसंदर्भात एक लेख रॉयल एशियाटिक सोसायटीच्या विशेषांकात नमूद केला आहे की, कातकरी भाषेचा संबंध भिल्ली भाषेशी येतो. 'काथाडी' हा शब्द भिल्ली बोलीभाषेत 'कातुडे' असे म्हटले जाते. मात्र कातकरी/कातुडीभाषा भिल्ली बोलीपेक्षा अधिक हेल काढून बोलली जाते.

वारली, कातकरी प्रमाणेच महादेव कोळी, ठाकर या जमातीही मराठीच्या खूप जवळ गेल्याचे आढळून येते. या ना त्या कारणाने आदिवासी भाषा लुप्त होत आहेत. काही भाषा नामोल्लेखापुरत्याच राहण्याची शक्यता असली, तरी ज्या बोली बहुसंख्येने बोलल्या जातात त्या बोलींवर तरी आपण अभ्यास करणार आहोत का? की फक्त लोकगीतांच्याच संकल्पनांवर तहान भागविणार आहोत. हे खरे आहे की, लोकगीतांच्या संकलनाने बोलींच्या अभ्यासाला दिशा मिळणार आहे.

बोलीभाषांची शब्दमर्यादा त्या-त्या समुहापुरती मर्यादित असते. त्यांचे दैनंदिन जीवनव्यवहार मर्यादित असल्याने आणि गरजा सीमित असल्याने त्यांची शब्दसंपदाही तशी कमीच असते, पण त्या मर्यादित शब्दसंपदेवर त्यांचे दैनंदिन व्यवहार सुरळीत चालत असतात. एका तालुक्यात वा एका जिल्ह्यात २/५ पेक्षा अधिक जमातींचे वास्तव्य असते. त्या प्रत्येक जमातीची बोली स्वतंत्र असते, पण या सर्व जमातींची समाजव्यवहाराची एकच बोली असते. जसे खानदेशात वास्तव्यास असलेल्या १६/१७ जमातींची स्वतंत्र बोली असली, तरी सगळ्यांची सामाजिक-सांस्कृतिक व्यवहाराची भिल्ली ही एकच बोली आहे. भिल्ली बोली बोलणाऱ्यांना दुसरी कोणती बोलीभाषा येवो न येवो, पण खानदेशातील प्रत्येक जमातीला भिल्ली बोली बोलता येते व समजते हे विशेष आहे. या बोलींचा अभ्यास लोकवाङ्मय आणि दैनंदिन व्यवहारातील शब्दसंपत्तीच्या आधारे मराठी भाषाशास्त्राच्या नियमानुसार या बोलींचा अभ्यास करणे शक्य आहे. कारण वाक्यरचना मराठीतील कर्ता, कर्म, क्रियापद या क्रमांनुसारच असते. शिवाय त्या समूहाची एक समाजभाषाही असते. पश्चिम खानदेशातील कोकणी बोली अहिराणी सदृश्य वाटते. तर डांगी बोलीभाषा गुजराती सदृश्य आहे. पावरा बोलीभाषेवर हिंदी, गुजराती आणि राजस्थानी मेवातीचे संस्कार आहेत. मावची, घाटी, डांगी या बोली संमिश्र स्वरूपाच्या आहेत; पण प्रत्येकीची शब्दसंपदा भिन्न आणि स्वतंत्र वाटते. धानका, कोटली, दुब्ळा या बोलीवर अहिराणी, मराठी, गुजराती आणि हिंदीचा प्रभाव आहे. कोटली बोली पूर्णतः संमिश्र आहे.

या बोलीभाषांचे वैशिष्ट्य म्हणजे सातत्याने त्यांच्यात भाषिक आदान-प्रदान होत असते. शब्द सतत खेळते राहातात. म्हणूनच या बोली आजही जिवंत आहेत.

२०११ च्या जनगणनेत मातृभाषा नोंदवावी असे आवाहन होते, जेणेकरून कोणती भाषा कोणती बोली-बोलणारे किती लोक आहेत याचा ताळेबंद मांडता येईल. पण आदिवासी जमाती ज्या शहरांमध्ये नगरांमध्ये नोकरी व्यवसायानिमित्त स्थिरावल्या आहेत त्या जमाती आपली मूळ मातृभाषा लपवतात. त्यांना आम्ही भिल्ल आहोत, पावरा आहोत, कोकणा आहोत, आमची मातृभाषा भिल्ली, पावरी, कोकणी आहे याची लाज वाटते. त्यामुळे प्रत्यक्षात या बोली अस्तित्वात असल्या तरी कागदोपत्री त्यांची नोंद व्यवस्थित होत नाही. यात आपले नुकसान होते आहे; हे या आदिवासी जमातीच्या गावीही नाही. शिवाय आपले वेगळेपण, आपले अस्तित्व आणि अस्मिता टिकवायची असेल, तर आपली बोली हेच प्रमुख साधन आहे, याची जाणीव त्यांच्यात निर्माण होणे आवश्यक आहे.

बोलीभाषा कोणत्या लिपीत लिहिल्या जाव्यात हे त्या-त्या बोलभाषिकांचे स्वातंत्र्य आहे. महाराष्ट्रात राहाणारे आदिवासी मराठी भाषेतून अर्थात देवनागरी लिपीतून लिहू शकतात, तर गुजरातमधील आदिवासी गुजराती लिपीतून गुजराती भाषेत लिहू शकतील. ज्या भाषेतून त्यांना व्यक्त होणे सहजसुलभ आणि प्रभावी वाटेल त्या भाषेतून त्यांना लिहिता येते. भविष्य कोणाला कळते, कदाचित यापैकी एखादी बोलीभाषा जागतिक पातळीवर आपले स्थान निर्माण करेल म्हणूनच डॉ. गणेश देवी यांची विधाने प्रभावी वाटतात. उदाहरण द्यायचे झाल्यास खानदेशातील भिल्ली बोली जी राजस्थानी आणि गुजरातीच्या समकालीन आहे. मात्र या बोलीभाषेतील ध्वनी व्यवस्था व उच्चारण शैली बंगाली भाषेला जवळची वाटते. बंगालीत काही नाथांची रूपे लिंगानुसार बदलतात, तशी भिल्ली बोलीतही बदलतात. पण शब्दांमध्ये थोडासा बदल होऊन शब्द तसेच येतात. जसे

| **मराठी** | **बंगाली** | **भिल्ली** |
|---|---|---|
| बकरा | पांढा | पाटडो |
| बकरी | पांढी | पाटडी |
| मेंढा | भॅडा | मेडो |
| मेंढी | भेडी | मेडी |
| आत्या | पिशी | फुची |
| किती | कॉतो | कोतो |
| कच्चे | कॉचो | काचो |
| म्हणून | ताई | तियाल |
| पाल्लो | दंखा | देख्यो |
| साजराकणे | पोलोलकॉरा | पालनीकेथी |
| बहिण | बोन | बोहि |
| श्रीमंत | बॉडोलोक | मोडालोक |
| सासू | शासुडी | हावडी |
| सकाळ | शॉकाल | हाकाल |

याप्रमाणे बरेचसे साम्य वर्णउच्चार आणि वर्णपरिवर्तनात् होते.

भिल्ली बोलीभाषेत आढळणाऱ्या शब्दसंपत्तीवरून प्राचीनता–

संस्कृत तद्भव - अन्न-ओन, अस-आही, तृण-तोण, तप्त-तोप्यो इ.

प्राकृत - अइगय-आवीगियो, अस्सू-आहवे, आअक्ख-आख इ.

प्राकृत अपभ्रंश - थेरी - थेअ, निक्कस - निंग, गालिअ - गोलेहे इ.

यादवकालीन - एकलो - एखलो, कदरणे - किदरायो, धुमको - मुको इ.

तंजावरी - असट-आसो, निसरणे-निहय्यो, बिढार-बिडारों इ.

हिंदी - आफत, आबादी-आबाद, मोघम, नतिजा, नांदार, वग इ.

गुजराती - आवजो-आवजा, कोदरा-कोदरी, बलतण-बोलतू, बेसो-बाहो.

यांशिवाय तमीळ भाषेतील काही शब्द वर्णपरिवर्तन, वर्णविस्तार वा अपभ्रंश होऊन रूढ झालेले शब्दही भिल्ली बोलीभाषेत आढळतात. उदा. अक्कु (तमिळ), आटको (भिल्ली), अडैवल् (तमिळ), अडुक (भिल्ली), आमिलम (तमिळ), आमली (भिल्ली), आरल (तमिळ), आसे (भिल्ली), आवली (तमिळ) आली (भिल्ली), आसरा (तमिळ), आसरा/आसरो (भिल्ली), उच्चम (तमिळ), उचों (भिल्ली), उपरिगै (तमिळ), उपरिपे (भिल्ली) या शब्दांचे अनुक्रमे मराठी अर्थ हाड, आडवे, अडथळा, म्हणून, दगड वा तत्सम वस्तू लावणे, चिंचेचे झाड, विस्तव, रांग, आसरा, उंच, वरचा मजला इ.

या भिल्ली बोलीच्या खाणा-खुणा वारली बोलीतही आढळतात हे आपण पाहिले. काही शब्दांच्या उदा. हे अधिक स्पष्ट होईल. कुत्रा (मराठी) हुणो (भिल्ली) सुनो (वारली) इ. मराठीतील 'त्याने' संबोधन दर्शकनाम भिल्लीत 'तियांय', तर वारली बोलीत 'त्याहान' असे रूढ आहे. खानदेशात बोलली जाणारी भिल्ली जशी राजस्थानी आणि गुजरातीच्या मधली कडी आहे तसेच खानदेशातील 'मथवाडी' (डोंगरी भिल्ली) ही भिल्ली आणि पावरी बोलीभाषांच्या मधली कडी आहे.

या बोलींची समृद्धता काही म्हणी वाक्प्रचारांवरूनही लक्षात येते.

कोरक - आपला टिटेन नाङगालेज आखे गुणडावेज
भिल्ली - आपु आथाहली आपुन पागावे कुडवाडो टाकी लेवो
मराठी - आपल्या हाताने आपल्या पायावर कुऱ्हाड मारणे.
कोरकू - चिमणी इटान अनदश
भिल्ली - दिवा तोलो आंदारो/चिमनी ऐठा आंदारो
मराठी - दिव्याखाली अंधार.
कोरकू - खनडा सोकूडा उठू घागटा.
भिल्ली - आदवाड मांडापे मांवो होदे
मराठी - अर्ध्या भाकरीवर भाजी शोधणे.
वारली - मेला तो गेला
भिल्ली - मोअयो तो गियो.
वारली - जीवाला मरण नाही, काय कोमते (काय-शरीर, देह)
भिल्ली - जीव मोअतो माहा काया/डिल कोमाअहे (डिल-शरीर देह)
वारली - परमेसर देता न तोच नेता
भिल्ली - भगवान देहे ने लोण लेहे
मराठी - परमेश्वर जीव देतो व तोच नेतो.
वारली - परनेवला त मरणवेला
भिल्ली - वोराडाहिने मोये ताव
मराठी - लग्न केले आहे ते मरणापर्यंत नाते टिकवा

यांप्रमाणेच प. खानदेशातील आदिवासी जमातीच्या बोलीभाषेतील शब्दसंपत्ती कशी समृद्ध आहे याची दोन-चार उदा. पाहू. ती त्या बोलींची स्वतंत्र वैशिष्ट्ये दर्शविणारी आहेत.

भिल्ली - ओडाणी खेरा सुखी (असानी सुखी असतात.)

भिल्ली - चाचळी दे तो चारोबी देहे (चोच देतो तो चाराही देतो.)

कालो बियावे उजाणे वोथोवे. (काळे ढग फक्त गडगडाट करतात. पाण्याचे पांढरट ढग मात्र बरसतात.)

डागोहो बोले ना बादाहन देखाय, डेडिय बोले ता केडाल नाय देखाय.

(वडवानल जंगलाला आग लागली तर साऱ्यांना दिसते, पोटातील आग मात्र कुणाला दिसत नाही.)

**पावरी**

पावरी - कतरुक बी चुरी करहे, तिनाहा नो पुरे, कमाई करहे तेवी पुरहे.

(कितीही मोठी चोरी केली तरी ती पुरत नाही पुरते ती कष्टाची कमाई.)

जुवान देखिल जीवणू नी, डाया देखिन मल्लू नी.

(तरुण म्हणून जगता येत नाही आणि वृद्ध म्हणून मरता येत नाही.)

आंदला हाते चालतु नी, बोयरा हाते वातू नी कल्लू

(आंधळ्याबरोबर चालता येत नाही बहिऱ्याबरोबर बोलता येत नाही.)

**कोकणी**

कानाला खडा लाई लिधले (कानाला खडा लावला).

चालती गाडीला वट लावणेल (चालत्या गाडीला अडथळा आणणे).

तीस लागणी तवज हीर खंदाना (तहान लागल्यावर विहीण खोदणे).

अशा या समृद्ध भिल्ली बोलीभाषेचा भाषिक अभ्यास होणे अत्यंत आवश्यक आहे. या सर्व विवेचनावरून आपल्या लक्षात येते की ही भिल्ली बोली अतिशय प्राचीन आहे. पण दुर्दैव हे की, या जमातीचा अभ्यास आजपर्यंत झालेला नाही. बरेचसे अभ्यासक आपल्या ग्रंथामधून या जमातीचा फक्त उल्लेख करतात. फारशी माहिती देत नाही किंवा ती जाणून घेण्याचाही प्रयत्न करीत नाहीत. या बहुभाषिक आदिवासी जमातींच्या भाषांचा अभ्यास होणे आवश्यक वाटत असले तरी हळूहळू या जमाती आपल्या मातृभाषेपासून दुरावत चालल्या आहेत असे वाटत असतानाच कॉ. वाहरू सोनवणे सी.सी. राठवा सर आपल्या मातृभाषेतून कविता लिहून त्या भाषेची समृद्धी अभ्यासकांसमोर आणत आहे हे ही नसे थोडके.

**संदर्भ ग्रंथ :**


'ढोल' बोलीभाषा विशेषांक (दिवाळी अंक - २००३)
हाकारा - वारली बोलीभाषा व लोकगीते (जून - १९९७)
प. खानदेशातील आदिवासी
शब्दकोश - डॉ. गावित
कोरकू बोलीभाषा - डॉ. काशिनाथ बऱ्हाटे


❖❖❖


**- डॉ. पुष्पा यशवंत गावित**
ए-२, व्यंकटेश प्लाझा,
जानकीनगर, वाडीभोकर, रोड,
देवपूर, धुळे ९४२१५३१००५







अनुक्रमणिका

# डॉक्टर-पेशंट संवादाची मराठी बोली

– डॉ. अरविंद संगमनेरकर

*[सुसंवाद साधण्यासाठी, अन्य भाषेतले शब्द रूढ होतात. पुढे भाषा ते शब्द दत्तक कसे घेते; त्या प्रक्रियेचा हा वैद्यक क्षेत्रातील अनुभव.*
*–संपादक]*

भाषेचा उगम का झाला, याचं साधं, सोपं उत्तर आहे - कोणाला काहीतरी सांगायचं असतं; आणि कोणाला तरी किंवा समोरच्याला ते ऐकून आणि समजून घ्यायचं असतं. यातूनच दोघांचा, किंवा नंतर अनेकांचा संवाद सुरू होतो. थोडक्यात संवाद साधण्यासाठी, एकमेकांचं म्हणणं समजून घेण्यासाठीच, भाषेचा उगम झाला असावा. नुसत्या खाणाखुणा करून जेव्हा संवाद अपुरा वाटू लागला, तेव्हा संवादासाठी भाषा जन्माला आली. तान्ह्या मुलांना बोलता येत नाही, ते आपल्या आईशी आणि इतरांशी संवाद, आपल्या रडण्यानं, हसण्यानं, किंवा हातपाय हलवून, तर कधी हातपाय आपटून करायला लागतं. हळूहळू मोठं व्हायला लागल्यावर, एकेक शब्द शिकत छान बोलायला लागतं. लहान मुलांची भाषा जशी तयार होते, तसंच काहीसं, कोणतीही भाषा संवादासाठी तयार होत असावी. भाषेचा मूळ पाया, एकमेकांशी संवाद साधणं, समजून घेणं हाच असतो.

यातूनच वेगवेगळ्या मुलखात, भौगोलिक आणि सामाजिक परिस्थितीनुसार आणि आजूबाजूच्या वातावरणानुरूप, नवे शब्द, नव्या रचना उगम पावतात. काही वेळा त्यांच्या उच्चारांत बदल होत जातात, आणि काहीवेळा त्यांच्यातूनच नवीन भाषा उदयाला येतात.

एकच भाषा, वेगवेगळ्या मुलखात बोलली जात असेल, तर तिथल्याही सामाजिक, आणि भौगोलिक परिस्थितीचा परिणाम त्या भाषेवर होत जातो; आणि त्यातूनच त्या भाषेची वेगवेगळी रूपं दिसायला लागतात. मूळ भाषा एकच असते. पण तिची बोलीभाषेच्या रूपातून वेगवेगळी रूपं दिसायला लागतात, जसं महाराष्ट्रात प्रमाणित मराठी भाषेबरोबरच, खानदेशातील-अहिराणी, पश्चिम विदर्भातील-वऱ्हाडी बोली, मराठवाड्यातील उर्दूमिश्रित मराठी भाषा, कोल्हापूर, सांगलीकडची-कानडी हेल असलेली भाषा, कोकणातील अनुनासिक कोकणी, कोळी, आगरी लोकांची भाषा अशा वेगवेगळ्या बोलीभाषा उदयाला आल्या.

मराठीत या जशा वेगवेगळ्या बोलीभाषा तयार झाल्या आहेत, त्याचप्रमाणे डॉक्टर-पेशंट संवादाची एक भाषा तयार झाली आहे. त्याला आपण डॉक्टर-पेशंट संवादाची 'वैद्यक बोलीभाषा' म्हणू या.

वैद्यक बोलीभाषेचा मुख्य उद्देश, पेशंटला आपल्याला काही त्रास होतोय, हे डॉक्टरला, नर्सला किंवा हॉस्पिटलमधील इतर स्टाफला सांगायचं हा असतो. पेशंटला आपल्या आजाराबद्दलची माहिती सांगायची असते. त्याचबरोबर आधीच्या आजाराच्या आणि आरोग्याच्या काही तक्रारी असतील तर त्याही त्याला सांगायच्या असतात. याचबरोबर, औषधं कशी घ्यायची, कोणत्या तपासण्या करायच्या, एकूण उपचार काय करावे लागतील, याची माहिती डॉक्टर किंवा नर्सला पेशंटला समजून सांगायची असते. या डॉक्टर-पेशंट संवादाच्या गरजेतूनच - 'नीड बेसड्' ही वैद्यक बोलीभाषा तयार झाली आहे. मग ती मराठीत असेल, किंवा इतर भाषेत असेल.

अशाच प्रकारे, गरजेतूनच शेतकऱ्यांची, इंजिनिअर्सची, व्यापाऱ्यांची एवढंच काय



अनुक्रमणिका

स्वयंपाकघरातलीही बोलीभाषा तयार झाली आ; आणि याचप्रमाणे त्या-त्या क्षेत्रातली व्यावहारिक, नवीन बोलीभाषा तयार होत जाणार आहेत.

डॉक्टर आणि पेशंटला आजाराबद्दल पटकन माहिती होणं; आणि मुख्यत: त्यातून पेशंटला लवकर उपचार सुरू करता येणं, हा या वैद्यक बोलीभाषेतचा व्यावहारिक उद्देश आहे. याचबरोबर साथीच्या रोगांची- 'कम्युनिटी डिसिजेस'-औषधं कशी घ्यायची, आजारावर लस असेल, तर त्याचे डोसेस कधी आणि कसे घ्यायचे, रोगाचा फैलाव होऊ नये म्हणून काय खबरदारी घ्यायची, इत्यादी माहिती, तसेच आम जनतेचा शासनाशी संवाद साधण्यासाठी आणि त्याचबरोबर आजारांबद्दलची वेगवेगळी माहितीपत्रकं, 'मीडियातल्या' बातम्या, सूचना, आजारांची पोस्टर्स, हीही या वैद्यक बोलीभाषेत तयार करावी लागतात. यातूनच आजाराबद्दलची माहिती तळागाळातल्या लोकांपर्यंत पोहोचू शकते; आणि आजारांवर नियंत्रण ठेवता येते.

वैद्यक बोलीभाषा ही मुख्यत: पेशंटला होणारा त्रास, त्याचा आजार यांच्याशी निगडित आहे. अर्थात या बोलीभाषेवर शहरी-ग्रामीण राहणी, व्यवसाय, सामाजिक पार्श्वभूमी यांचा परिणाम होऊ शकतो.

पेशंट त्याला होणारा त्रास डॉक्टरांना त्यांच्या बोलीभाषेत कसं सांगतात, याची अनेक उदाहरणं सांगता येतील. बोलीभाषेच्या संवादातून, एखादं चित्र काढल्यासारखं, पेशंटला होणारा त्रास, डॉक्टरला आणि इतर मेडिकल स्टाफला सहज कळू शकतो. वैद्यकातील बोलीभाषा अशी चित्रं न काढता, चित्ररूप होऊन गेली आहे. याचं अगदी साधं उदाहरण म्हणजे ग्रामीण भागात - 'मुलाला ताप आलाय' हे सांगताना आई किंवा त्याचे नातेवाईक- 'दोन दिवस झाले पोरगं तापलंय' असं सांगतात. पण तोच ताप जर खूप जास्त असेल, तर आमचा 'पेशंट तापानं फणफणलाय' असं म्हणतात. याच तापाला, शहरी भागात 'हाताला चटका बसतोय' अशा चपखल शब्दांत, वैद्यक बोलीभाषेत सांगतात.

संडासला काही त्रास होत असेल, जुलाब होत असतील तर जुलाब कसा होतो, हे बोलीभाषेतून डॉक्टरला अगदी सहज लक्षात येईल अशा शब्दांत, 'जुलाबाचे फोक पडताहेत' असं सांगतात. तर मध्यमवर्गीयांच्या बोलीभाषेत 'कढी पातळ झालीय' असे सांगतात. डिसेंट्री झालेली असेल तर बोलीभाषेत 'आव झाली' म्हणतात. किंवा 'चिकट शेम' पडते आहे असं म्हणतात. ग्रामीण भागांत मराठी बोलीभाषेत लहान मुलाच्या जुलाबाचं हुबेहुब वर्णन 'पोर पिळकतंय' या शब्दांत करतात.

पेशंटचा आणखीनच एक नेहमीचा त्रास म्हणजे पोटदुखी.

पोटात दुखतंय, हे बोलीभाषेत सांगायचं असलं तर, शहरी भागातले लोक 'पोटात दुखतंय' म्हणतात. ग्रामीण भागातील लोक 'पोटात चावतंय' काही भागात 'पोट ओरडतंय' म्हणतात. तर काही ठिकाणी 'पोट ताठरलंय' म्हणतात. मध्यमवर्गीय शहरी माणसं 'पोट बिघडलंय' म्हणतात. गंमत म्हणजे, सापाचा खेळ करणारे, मराठी भाषिक मदारी माणसं याला 'फॉर गॅस्ट्रिक' झालं असं म्हणतात.

याच पद्धतीने होणाऱ्या त्रासाचं मराठी बोलीभाषेत हुबेहूब वर्णन केलं जातं, ते म्हणजे डोकेदुखीचं. हाय सोसायटीत 'हेडेक' म्हणतात. बोलीभाषेत डोकेदुखीचं हुबेहूब वर्णन करणारे शब्द म्हणजे डोकं ठणठणतंय' किंवा 'डोक्यात घण घातल्यासारखं वाटतंय', 'डोकं धरलंय' किंवा 'अर्धशिशीचा त्रास आहे' असं सांगतात.

पोटात गॅस झाला असेल, तर पेशंट त्याचं मराठी बोलीभाषेत वर्णन खूप छान सांगतात– मध्यमवर्गीय मंडळी 'पोटात गॅसेस झालेत' म्हणतात, यालाच खेड्यातील मंडळी 'पोटात गॅस धरलाय' म्हणतात. 'पोटात गडगडतंय' असं शहरी भागात

म्हणतात. तर ग्रामीण भागात 'पोटातल्या पोटात जुलाब होतायत' असं म्हणतात.

लहान मुलांचं पोट फुगलं असेल, तर त्याचं हुबेहूब वर्णन – 'पोट डब्ब झालंय' या भाषेत सांगतात, तर फुगलेल्या पोटामुळे होणाऱ्या त्रासाचं, अगदी चपखल वर्णन बोलीभाषेत, 'पोटाचा नगारा झालाय' या शब्दांत करतात.

वैद्यक बोलीभाषेत पेशंटला होणारा त्रास नेमक्या चपखल शब्दांत कसा सांगितला जातो, याची अनेक उदाहरणं सांगता येतील. वैद्यकातली ही बोलीभाषा हा वेदनेचा उत्स्फूर्त हुंकार आहे. डॉक्टर-पेशंट संवाद सुरू राहावा, एकमेकांचं सांगणं दोघांनाही समजावं आणि त्यातून ताबडतोब उपचार सुरू व्हावेत, कृती व्हावी; हा बोलीभाषेचा मुख्य उद्देश आहे. त्यामुळे भाषेच्या शुद्धतेचा फारसा विचार करू नये. तसंच बोलीभाषेत वापरण्यात येणारे शब्द इंग्लिश, मराठी, हिंदी, ग्रामीण का शहरी आहेत याचाही बाऊ करू नये.

बोलीभाषेतले शब्द डॉक्टर-पेशंट संवादात आपोआप रूढ झालेले आहेत. ते काही कोणी मुद्दाम रुजवलेले नाहीत. याची साधी उदाहरणं द्यायची झाली, तर बहुतांशी सुशिक्षित, अशिक्षित, ग्रामीण शहरी माणसं – 'हार्टअटॅकचा' उल्लेख 'हृदयविकाराचा झटका' असा कधी करत नाहीत, तर 'हार्टअटॅक' असंच करतात. याचप्रमाणे 'ॲन्जिओप्लास्टी', 'बायपास सर्जरी', 'सिझेरियन सेक्शन', 'नॉर्मल डिलिव्हरी', 'फोरसेप डिलिव्हरी', 'ॲबॉर्शन', 'टेस्ट ट्युब बेबी', 'ब्लड बँक', 'ट्युमर', 'कॅन्सर' हे शब्द इंग्रजीमधले असले, तरी ते आणि असे अनेक शब्द रुढार्थाने वैद्यक मराठी बोलीभाषेमध्ये वापरले जातात.

याचप्रमाणे वेगवेगळ्या तपासण्यांचे रिपोर्ट, मराठी बोलीभाषेत, खूपसे इंग्रजी शब्द वापरूनच बोलले जातात. उदा. बोलीभाषेत ईसीजी, एक्स-रे, कोलेस्टेरॉल, थायरॉईड, सीटीस्कॅन, एमआरआय असे अनेक शब्द रूढ झाले आहेत. 'हृदयाचा आलेख', 'क्ष-किरण तपासणी', 'साखरेची तपासणी' असे शब्द डॉक्टरही वापरत नाहीत, आणि पेशंटही बोलत नाहीत. सहजपणे रुळलेले हे इंग्लिश शब्द बोलीभाषेत तसेच वापरले जातात. त्याच्यामागचा पेशंटला होणारा त्रास आणि वेदना कळणं हाच महत्त्वाचा भाग आहे. त्याचं कारण वैद्यक बोलीभाषा ही पुस्तकी भाषा नसून, डॉक्टर-पेशंट संवादाची, व्यवहाराची भाषा आहे. याचा मुख्य उद्देश आपल्याला काय होतंय, हे डॉक्टरपर्यंत पोहोचवणं एवढाच असतो. ही परिभाषा घडलेली भाषा असते, मुद्दाम घडवलेली नसते. समोरच्याची मातृभाषा कोणती आहे याचाही अडथळा बोलीभाषा वापरताना येत नाही. याचं अगदी नेहमीचं उदाहरण म्हणजे पेशंट मराठी बोलणारी असते, नर्स केरळी भाषिक असेल, आणि डॉक्टर हिंदी भाषिक असेल, तरीही त्यांचा संवाद चालू राहातो, एकमेकांशी बोललेलं, सर्वांना समजत असतं, संवाद चालू राहातो, आणि उपचार म्हणजे कृती, सुरू झालेली असते.

वैद्यकातल्या मराठी बोलीभाषेची आणखी एक गमतीदार गोष्ट म्हणजे – पेशंटची स्वतःची नाजूक दुखणी डॉक्टरला सांगताना, पेशंट सहसा मराठी शब्द वापरत नाही, तो इंग्लिश शब्दच वापरतो. विशेषतः लैंगिक आजारांबद्दल किंवा स्त्री-पुरुष संबंधाबद्दल काही त्रास होत असेल, किंवा स्त्रियांना अंगावर जाण्याचा काही त्रास होत असेल तर, डॉक्टरांशी बोलताना सुशिक्षित असो, नाहीतर अशिक्षित असो, डॉक्टर मला 'सेक्स प्रॉब्लेम' आहे; असेच शब्द वापरतो. त्या अनुषंगाने असलेले मराठी शब्द - उदा. मला लैंगिक त्रास होत आहे, असं कधीच सांगत नाही. लाज, मर्यादा, भीती, याच्यापोटी इंग्लिश शब्द वापरले जात असावेत. कालमानाने त्यातलेही काही शब्द बदलत जातात. आपण वापरलेले मराठीतील शब्द ओंगळ वाटू

नयेत, म्हणून पेशंट आडमार्गाने इंग्लिश शब्द वापरत असावेत. हा एकप्रकारे 'ग्राम्यता परिहार' आहे. बोलीभाषेतल्या या संवादाची अनेक उदाहरणे सांगता येतील - स्त्री-पुरुष संबंधाला 'सेक्स' या नावानेच संबोधलं जातं. 'सेक्सच्यावेळी दुखतं', किंवा 'सेक्स करताना ताठरता येत नाही', 'इरेक्शन होत नाही', 'नाजूक भागाचं दुखणं आहे', 'अवघड जागी दुखणं आहे', 'मेन्सेसच्यावेळी त्रास होतो' अशा वेगवेगळ्या इंग्रजी शब्दांत पेशंट त्याला होणारा नाजूक दुखण्यांचा त्रास सांगत असतो.

वैद्यकीय मराठी बोलीभाषेतील शब्द हे जसे पेशंटला होणाऱ्या त्रासावरून तयार झाले आहेत. तसंच काहीसं, वैद्यकातल्या वेगवेगळ्या ऑपरेशन्सची नावं ही सुद्धा मराठी बोलीभाषेत, वेगवेगळ्या स्वरूपात आणि अशीच मराठी आणि इंग्लिश अशा मिश्रस्वरूपात बोलली जातात. पेशंटला अपेंडिक्सचं ऑपरेशन समजून सांगताना – 'तुमचं आंत्रपुच्छ वाढलंय' असं सांगितलं तर, त्याला काही समजणार नाही. शहरी सुशिक्षित पेशंटला 'अपेंडिक्सला सूज आलीय म्हणून अपेंडिक्सचं ऑपरेशन करायला लागेल', असं सांगितलं तर समजू शकतं. तर हीच गोष्ट ग्रामीण भागातल्या पेशंटला त्यांच्या बोलीभाषेत 'अपेंडिक्सचा किडा वळवळतोय' असं सांगितलेलं अधिक चांगलं समजतं. 'घशातल्या टॉन्सिल्सच्या गाठी वाढल्या आहेत, टॉन्सिल्सला सूज आलीय, त्यासाठी टॉन्सिल्सचं ऑपरेशन करावं लागेल', हे सांगितलं तर सर्वसाधारण पेशंटला ते कळतं.

गर्भारपण आणि बाळंतपणाच्या बाबतीतही बोलीभाषेतील कितीतरी शब्द सर्वसामान्य माणसांनी वैद्यक बोलीभाषेत स्वीकारले आहेत. गर्भारपणासाठी – 'डॉक्टर माझी पाळी मीस झालीय.' 'डॉक्टर मी प्रेग्नंट आहे' असंच सांगतात, शास्त्रशुद्ध संस्कृतप्रचुर भाषेत 'मला गर्भधारणा झाली आहे' असे शब्द कोणी वापरत नाही, किंवा ते बोललेलं कोणाला समजणारही नाही. 'डॉक्टर माझी प्रेगन्सी टेस्ट पॉझिटिव्ह आहे', असं सांगतच नवीन पिढीतील मुली डॉक्टरकडे येतात.

वैद्यक बोलीभाषा हीपण सारखी बदलत असते. जशी शास्त्रीय परिभाषा बदलेल त्याप्रमाणे वेगवेगळे शब्द बोलीभाषेत यायला लागतात. बोलीभाषेत शब्दांना सोपेपणा आणलेला असतो एवढंच.

वैद्यक बोलीभाषेचा उद्देश, आणि मर्यादा या काहीशा ठरलेल्या आहेत. डॉक्टरांशी संवाद साधणं, बोलीभाषेतून आपल्या आजारांचं चित्रीकरण- 'पिक्टोरायझेशन' करणं, आणि त्यावरून डॉक्टरांनी पेशंटच्या तक्रारी समजून घेऊन, त्यावर उपचार समजावून सांगणं, हा एवढाच उद्देश यामागे असतो. बोलीभाषेचं स्वरूप एवढंच मर्यादित राहील. बोलीभाषेला भाषाशास्त्राचे सर्व नियम लागू पडतीलच असे नाही. त्याचबरोबर वैद्यक बोलीभाषेत, मराठी शब्दांबरोबरच रूढ झालेले हिंदी, इंग्रजी शब्द हेही जास्त प्रमाणात येतात. त्यांचं मराठी भाषांतर करणं अवघड आहे आणि भाषांतर झालं तरी, ते बोलीभाषेत वापरलं जाणं त्याहून अवघड आहे. वैद्यकशास्त्रातील ऑपरेशन्स, तपासण्या, औषधं, संशोधन जसंजसं वाढत जाईल, तसतसे नवेनवे शब्द, नव्यानव्या संज्ञा – रूढ व्हायला लागतील, काही जुने शब्द, जुन्या संज्ञा निघून जातील.

वैद्यकातील मराठी बोलीभाषा ही विकृती, व्याधी, अश्लिलता, अमंगल टाळून डॉक्टर-पेशंट यांचा संवाद साधणारी लोकगंगा आहे. तिचं स्वागतच केलं पाहिजे.

❖❖❖

**डॉ. अरविंद संगमनेरकर**
कॉलनी नर्सिंग होम
नवी पेठ, पुणे ४११०३०.
दूरभाष : (०२०) २४५३२५५५,
२४४३४५५५

# निवडक नवे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसाठी आलेल्या ग्रंथांपैकी निवडक ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर

– लेखन : नंदा सुर्वे

**अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा परामर्श घेत जाणाऱ्या कथांचा संग्रह 'ऑफ लाईन'**

दिवसेंदिवस कथावाङ्मय विस्तारत आहे. प्रगल्भ होत आहे. कुटुंबकथा, रहस्यकथा, हास्यकथा, ते विज्ञानकथा अशा विविध प्रकारांतून ती पुढे जाते आहे. झेपावते आहे. डॉ. बाळ फोंडके हे विज्ञानलेखक म्हणून नामांकित आहेत. त्यांचा 'ऑफ लाइन' हा कथासंग्रह नव्यानेच वाचकांसमोर आला आहे. लेखकाचं आधुनिक तंत्रज्ञानाच्या अंगानं असलेलं अनुभवविश्व खूप संपन्न असल्याचा प्रत्यय यातील कथा वाचताना लक्षात येतं.

आधुनिक तंत्रज्ञानानुसार अलीकडच्या काळात अनेक व्यवहार संगणकाच्या माध्यमातून 'ऑन लाईन' केले जातात. त्यामुळे वेळेची, पैशाची, मनुष्यबळाची बचत होते. धावपळ करावी लागत नाही. त्यामुळे जीवाची घालमेल, दमछाक होण्याचे वाचते. पण माणसां-माणसांमधले संपर्क, दळणवळण थांबतं. त्यातून एक प्रकारची भावुकता येते. भावनात्यांचा दुष्काळ पडल्यासारखा होतो. माणसं आणि माणुसकी एकमेकांपासून लांब गेल्यासारखी होतात. ही भावहानी टाळण्यासाठी, मानवीजीवनातला प्रत्यक्ष भेटीगाठींमधला खराखुरा आनंद मिळवण्यासाठी एका कुटुंबाकडून त्यांच्या मुलाच्या लग्नाचं आयोजन पूर्वपरंपरेनुसार केलं जातं. म्हणजे घरी जाऊन रीतसर आमंत्रण करणे; आणि अनेक निमंत्रितांच्या समवेत लग्नसोहळा संपन्न करणे. यात वावगं वाटण्यासारखं काहीच नाही. पण कथेमध्ये अत्याधुनिक इलेक्ट्रॉनिक्सचं जग उभं केलं आहे. जवळपास सर्व व्यवहार 'ऑन लाईन' चालतात असं चित्र उभं केलं आहे. त्याला छेद देण्याच्या भूमिकेतून वर उल्लेख केलेले कुटुंब सरसावले आहे. अन् दुसरे अत्याधुनिकतेच्या कवचाखाली जगणारे कुटुंब त्यांची काहीशी कुचेष्टा करते. पुढे प्रत्यक्ष लग्नसमारंभात त्यांची तरुण मुलगी मात्र त्यातला आनंद भरभरून लुटते. अनेक उपस्थितांना तो सोहळा खूप भावतो. ते पारंपरिक, कुटुंब यशस्वी होते. 'ऑन लाईन' पेक्षा 'ऑफ लाईन' यशस्वी होते. माणसा-माणसांमधली भावनाती टिकवणारी आपली पारंपरिक जीवनशैली अधिक समृद्ध, अधिक सुजाण होते; याचा पुन:प्रत्यय ही कथा वाचताना मिळतो. ही कथा मुळातूनच वाचायला हवी. जाणून घ्यायला हवी.




'अवतार' या कथेत एक फसगत झालेली तरुणी आहे. कथाकल्पना नवीन नाही. अनेकदा ऐकला-वाचलेला विषय आहे. लग्न करून अमेरिकेत मुलीबरोबर 'लिव्ह-इन' रिलेशन आहे किंवा लग्न झालेलं आहे. मग तिची कुचंबणा, संघर्ष सुरू झालेला असतो. या कथेमधल्या तरुणीचा संघर्ष थोडा वेगळ्या प्रकारचा आहे. कॉम्प्युटरमधल्या गेममधून ती स्वत:ला जिंकत ठेवते. मनाला बळकटी देत राहाते; आणि त्यातूनच स्वत:ची सुटका करून घेण्याची गुरुकिल्ली तिला सापडते.

'चोरी', चिटचॅट, गेम, रिॲलिटी शो, चिनी कम, स्मार्ट फोन, त्सुनामी यायला हवी, गुरूची विद्या या कथाही आधुनिक तंत्रज्ञानाच्या विविध पायऱ्या चढत





अनुक्रमणिका

जातात. वाचकाच्या ज्ञानकक्षा त्यातून रुंदावतात. वेगळ्या विश्वाची, वेगळ्या विषयाची नव्याने ओळख होत जाते. भावनाची बदलती जीवनशैली, विज्ञानाने केलेली प्रगती अन् तंत्रज्ञानाच्या आहारी गेल्याने होणारे फायदे-तोटे हा या पुस्तकातील कथांचा गाभा आहे. लेखकाने आधुनिक जगात वेगाने बदलत जाणाऱ्या जीवनशैलीचे अनेक पैलू उलगडून दाखवले आहेत. कथांमधील व्यक्तिरेखा अनेकदा अचंबित करतात. अंतर्मुख करतात.

तंत्रज्ञानाचा सुजाणतेनं अवलंब केला तर ते आपल्याला वरदान ठरू शकते. नाहीतर तो शाप ठरण्याच्या संभाव्य धोक्याबाबत सजग राहाण्याचं सूचनही या कथा करतात. विज्ञानाच्या जादूची अनेक उदाहरणे या कथांमधून मिळतात.

विज्ञान-तंत्रज्ञान हा विषय एका विशिष्ट पातळीवर गेल्यावर समजायला थोडा अवघड होतो. पण लेखकानं या कथा सोपेपणानं, दुर्बोधता टाळण्याचा प्रयत्न करत लिहिलेल्या आहेत. त्यामुळे त्यातील ज्ञानवर्धनाचा मूळहेतू वाचकांसमोर नीटपणे पोहोचतो. काळानुरूप बदलत जाणारे तंत्रज्ञान वाचकांना समजते. कारण तंत्रज्ञानाचा अवलंब हा मानवी जीवनाचा अविभाज्य घटक बनत चालला आहे. एका विज्ञाननिष्ठ लेखकानं या कथांमधून हा भरीव संदेश दिलेला आहे. त्यामुळे कथा वाचाव्यातच अशा.

**पुस्तक : 'ऑफ लाईन',**
*लेखक :* डॉ. बाळ फोंडके,
*प्रकाशक :* साकेत प्रकाशन, औरंगाबाद,
*पाने :* १६०, *किंमत :* १६० रु.

### डॉ. बाबासाहेब आंबेडकर धम्मविषयक पत्रे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे २० व्या शतकातले युगप्रवर्तक थोर व्यक्तिमत्त्व. सामाजिक, राजकीय क्षेत्रातलं त्यांचं कर्तृत्व जेवढं उत्तुंग तेवढंच शैक्षणिक, आर्थिक, सांस्कृतिक क्षेत्रातही श्रेष्ठत्व. तळागाळातला, पीडित, दलित म्हटला गेलेला माणूस हा त्यांच्या चळवळीचा केंद्रबिंदू होता. मुळात विषमतेवर आधारित समाजव्यवस्थाच त्यांना मान्य नव्हती.




'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा पत्रव्यवहार या विषयावर लेखिकेनं प्रबंधलेखन केले आहे. तो त्यांचा अभ्यासाचा विषय आहे. प्रस्तुत पुस्तकात पत्रांच्या आधारे अभ्यासाचा विषय आहे. प्रस्तुत पुस्तकात पत्रांच्या आधारे बौद्ध धम्माच्या विचारांचे विवेचन केले आहे. त्यांच्या ५०/६० पत्रव्यवहारांचा यात समावेश आहे. हिंदू पंडित, विज्ञान अभ्यासक, सामान्य कार्यकर्ते असा बौद्ध धम्माबाबतचा हा चौफेर पत्रव्यवहार आहे. विचार, भावना, बुद्धी यांचा मेळ यामधून दिसतो.

'हिंदू समाज हा एक मनोरा आहे. एक एक जात म्हणजे त्याचा एक एक मजलाच होय. पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, या मनोऱ्याला शिडी नाही, आणि म्हणून एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जाण्यास मार्ग नाही' हा खेद डॉ. आंबेडकरांनी व्यक्त केलाय.

त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दाखले अनेक ठिकाणी आपणास वाचायला मिळतात.

डॉ. आंबेडकरांच्या विचारसरणीवर पत्रांद्वारे लेखिकेनं वेगळा प्रकाश टाकला आहे.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर धम्मविषयक पत्रे**
*लेखक :* डॉ. माधवी खरात
*प्रकाशक :* माधवी प्रकाशन, येरवडा, पुणे ६
मो. ९५४५२७७४१०

### इंडियन कॉर्पोरेट आयडॉल्स

भारताच्या उद्योगजगात आपल्या नावाचा, उद्योगाचा, उच्चतम ठसा उमटवणाऱ्या उद्योजकांचा ठळक परिचय लेखकानं लालित्यपूर्ण भाषेत करून

दिला आहे. एकूण चौदा महत्त्वपूर्ण उद्योजकांच्या जीवनकार्याविषयी, त्यांच्या औद्योगिक उलाढालीविषयी लेखन या पुस्तकात झाले आहे. खरं तर हा धावता आढावा आहे असंच म्हणावं लागेल. कारण प्रत्येकाचं प्रचंड उद्योगविश्व आहे. कोट्यवधी रुपयांची उलाढाल, त्यात राबणारे, बुद्धिकौशल्याचा कस लावणारे हजारो लोक आहेत. प्रत्येक उद्योजक म्हणजे एक स्वतंत्र पुस्तकच आहे. पण वाचकांचं कुतुहल, जिज्ञासा शमवण्याचं काम लेखकाच्या समर्थ लेखणीतून उतरलेलं आहे.

यात टाटा, बिर्ला, धीरूभाई अंबानी यांच्यासारखे बुजुर्ग उद्योजकांबरोबरच आय.टी. तज्ज्ञ नारायण मूर्ती, माध्यमसम्राट सुभाषचंद्र गोयल, दूरसंचार क्षेत्रात गरुडझेप घेणारे सुनील भारती मित्तल, कृषी क्षेत्रातील अग्रगण्य बद्रीनारायण, बारवाले, 'विप्रोचे सर्वेसर्वा अझीम प्रेमजी, पोलादसम्राट लक्ष्मीनिवास मित्तल, अष्टपैलू नवीन जिंदाल, उद्योगसम्राज्ञी किरण मुजुमदार–शॉ, चतुरस्त्र उद्योजक भवरलाल जैन यांच्यावर प्रकाशझोत टाकलेला आहे. सर्व वयोगटांतील वाचकांना प्रेरक आणि उद्‌बोधक ठरेल असे हे पुस्तक आहे.




**इंडियन कॉर्पोरेट आयडॉल्स**

*लेखक :* सुधीर सेवेकर

*प्रकाशन :* साकेत प्रकाशन, औरंगाबाद.

**नोबेल कथा**

'नोबेल' या जागतिक स्तरावर दिल्या जाणाऱ्या पुरस्काराची पार्श्वभूमी आणि विविध क्षेत्रांत नोबेल पुरस्कार मिळवणाऱ्या व्यक्तींचा परिचय आणि त्यांच्या असामान्य कार्याचा वेध या पुस्तकात लेखकानं खूप परिश्रमपूर्वक घेतला आहे.

अखिल मानवजातीच्या कल्याणासाठी केलेल्या सर्वोत्कृष्ट कामगिरीबद्दल निरनिराळ्या क्षेत्रांमधील असामान्य व्यक्तींना गेली ११२ वर्षे नोबेल पुरस्कार दिला जात आहे. आंतरराष्ट्रीय स्तरावर दिला जाणारा हा पुरस्कार अत्यंत प्रतिष्ठेचा मानला जातो. त्या - त्या देशालाही ते भूषणास्पद वाटत असते. त्यामध्ये रवींद्रनाथ टागोर, सी.व्ही. रमण, अमर्त्य सेन ही भारतीय नावे ठळकपणे आपल्यासमोर आहेत.

आजवर साडेआठशेहून अधिक जणांना आल्फ्रेड नोबेल यांच्या नावाचा अत्युच्च पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले आहे. या पुस्तकामध्ये ४७ निवडक दिग्गजांचा व्यक्तिपरिचय आणि त्यांच्या संशोधनकार्याची तपशीलवार माहिती दिली आहे. डॉ. रॉबर्ट कॉक, केमोथिरपीचे जनक पॉल एर्लिच, अँजिओग्रीफीतज्ज्ञ डॉ. बर्नर फोर्समन, प्रोटॉनचे संशोधक रुदरफोर्ड, वर्णभेदासाठी लढणारा मार्टिन ल्यूथर किंग, क्षमाशील नेता नेल्सन मंडेला, मादाम मेरी क्युरी असे सर्वच विचक्षण संशोधक, अभ्यासक यांच्याविषयी लेखकानं सहजसुंदर, नितळ भाषेत लिहिलं आहे. सर्वच वयोगटांतील वाचकांनी आवर्जून वाचावं आणि स्वत:ला समृद्ध करावं असं ज्ञानभांडार यात खुलं झालं आहे.




**नोबेल कथा**

*लेखक :* डॉ. प्रबोध चोबे

*प्रकाशन :* रोहन प्रकाशन, पुणे

**काँक्रीटची वनराई**

सध्याचा पर्यावरण संतुलन हा काळाच्या पुढे उभा असणारा प्रश्न आहे. त्याचा मूलभूत विचार या पुस्तकाच्या निमित्ताने लेखिकेनं मांडला आहे. शीर्षकात उपहास आहे. शहरांमध्ये नव्या-नव्या बांधकामांची प्रचंड गर्दी झाली आहे. त्यामुळे त्यांना क्राँक्रीटचं जंगल म्हणून हिणवलं जातं. इथली माणसं एकमेकांचं





अनुक्रमणिका



आणि पर्यावरणाचं शोषण करत असतात. क्राँक्रीटच्या जंगलातले कायदे अमानवी आणि पाशवी असतात. शहरी मानसिकता सतत स्पर्धेच्या कचाट्यात सापडलेली असते. हे सारं बदलण्याच्या दिशेनं लेखिकेचा हा छोटा प्रयत्न आहे.

या पुस्तकात 'शहरांबद्दलचे समज आणि अपसमज' या प्रकरणातून नगरांचा जन्म त्यांचा विस्तार यावर भर देत त्यातील गुणदोषांचे विवेचन केले आहे. शहरांची 'अर्थव्यवस्था आणि अर्थकारण', तसेच 'नागर संस्कृती', 'पाणी आणि पर्यावरण', 'रस्ते आणि वाहतूक' असे विभाग पाडून शहरी समस्यांकडे लक्ष वेधून घेतले आहे. 'राजकारणी, सत्ताधारी यांनी योग्य नियोजनाची कास धरली पाहिजे. कोणतेच आततायी, अवास्तव धाडसी प्रयोग शाश्वत विकासाला मारक ठरतात' असं लेखिकेनं म्हटलं.

अतिशय मेहनत घेऊन लिहिलेलं, अभ्यासपूर्ण आणि समाजाचं प्रबोधन करणारं हे पुस्तक आहे.

**पुस्तक : काँक्रीटची वनराई**

*लेखक :* सुलक्षणा महाजन

*प्रकाशक :* रोहन प्रकाशन, पुणे

### एक थोर तत्त्ववेत्ता – सॉक्रेटिस

ग्रीक तत्त्ववेत्ता सॉक्रेटिस हा ज्ञानमार्गी होता. धर्म-अधर्म, ईश्वर-निरीश्वर, कर्म आणि कर्मकांड याबाबत सॉक्रेटिसने आपली निर्भीड मते मांडली. धर्माचरण म्हणजे काय? ईश्वर म्हणजे काय? असे मूलभूत प्रश्न त्याने उपस्थित केले. जीवनाच्या अनेकविध साहित्य-तत्त्वज्ञान आणि कलामूल्यांनी युक्त असलेली ग्रीक संस्कृती ही युद्धप्रश्नही होती. अथेन्सच्या प्रजासत्ताक राज्यात लष्करी शिक्षण सर्वांना अपरिहार्य होते. सॉक्रेटिसनेही ते अनुभवले. त्यांची चिंतनशीलता




परिपक्व झाली. अचानक आलेल्या वादळामुळे आर्गिन्यूअसीच्या युद्धात जलसमाधी मिळालेल्या सैनिकांची प्रेते अथेन्सला आणता आलेली नाही म्हणून सेनापतीला 'लोकसभे'समोर उभे केले गेले. त्यावेळी त्या खटल्याचा अध्यक्ष असलेल्या सॉक्रेटिसने सामुदायिक आरोपातून सेनापतीची सुटका केली आणि आपली न्यायप्रियता दाखविली. चिठ्ठ्या टाकून अधिकाऱ्याची निवड करण्याच्या पद्धतीला त्याने विरोध केला. राजकीय सभेच्या सदस्यांना पगार देण्यास त्याचा कडाडून विरोध होता. नैतिक-अनैतिकतेचे त्याचे विचार राजकारण्यांना अडचणीत आणणारे होते. त्याची ईश्वरविषयक मतेही अमान्य झाली. ईश्वरीय देवदेवता मानवासारख्याच राग-लोभाने पछाडलं असल्याचे त्याचे मत खळबळजनक ठरले. अशा त्याच्या सत्यान्वेषी विचारांमुळेच त्याच्यावर सनातनी लोकांनी कारवाई करून त्यास देहदंडाची शिक्षा देवविली सॉक्रेटिसचे हे चरित्र वाचनीय आहे.

**एक थोर तत्त्ववेत्ता – सॉक्रेटिस**

*लेखक :* डॉ. सौ. नीता पांढरीपांडे

*प्रकाशन :* साकेत प्रकाशन, औरंगाबाद.

### फोडणी

विनोदी साहित्य वाचकांपुढे तसं कमी येतं. खळाळून हसवणाऱ्या पु. ल. देशपांडे, चिं. वि. जोशी, अत्रे यांच्याइतकी ताकद पकडणं अवघडच. मुळात विनोदी लिहिणं अजिबात सोपं नव्हे. पण काळाच्या ओघात मुकुंद टाकसाळे, मंगला गोडबोले, दीपा गोवारीकर यांनी दर्जेदार विनोदी लेखन केले. या प्रवाहात अधूनमधून काही लेखक आपला ठसा उमटवू लागले.

प्रा. मधुकर देशपांडे यांचा 'फोडणी' हा शीर्षकातच




खुसखुशीत वाटणारा विनोदी कथासंग्रह वाचकांसाठी प्रकाशात आला आहे. लोडशेडिंग जिंदाबाद, बिघडून घडलंय, चंदूचे म्याँव म्याँव, चंदूची दुसरी बायको, बसता बसता बसले, कार्यक्रमाची ऐशी की तैशी अशी विनोदप्रचुर शिर्षके असलेल्या १५ कथा या पुस्तकात समाविष्ट आहेत.

विनोदी लेखन करणाऱ्या लेखकाकडे नुसती विनोदनिर्मितीची दृष्टी किंवा वृत्ती असून पुरे पडत नाही, तर त्यासाठी भाषेवर हुकुमत असणे आवश्यक असते. कारण मुद्रित माध्यमांना वाचकांना हसवण्याच्या मर्यादा येतात. त्यामुळे विनोदी शैलीचे तारतम्य त्यांनी ठेवायला हवे. या संग्रहाच्या लेखकानं विनोदनिर्मितीचा चांगला प्रयत्न केला आहे. शाब्दिक, प्रासंगिक विनोदाची पकड छान ठेवली आहे. त्यामुळे कथा कुठेही कंटाळवाण्या होत नाहीत. वाचक आनंदानं वाचनात शिरून राहातो.

**पुस्तक : फोडणी**

*लेखक :* प्रा. मधुकर देशपांडे

*प्रकाशक :* प्रियांजली प्रकाशन

**प्रतिसाद – टी. एन. परदेशी**

'लोकसत्ता'च्या 'कवडसे' या साप्ताहिक सदरासाठी लिहिलेली ही स्फुटलेखने जीवनाच्या मूल्यांचा आणि श्रद्धांचा शोध घेणारी आहेत. संवेदनाक्षम मनाला आसपास घडणाऱ्या सामान्य मानवी-व्यवहारातून त्यांचे दर्शन होते. सहवासात आलेला एखादा साधा-नगण्य माणूसही सहज जाता-जाता एखाद्या उच्चतम मूल्याची पाऊलखूण सोडून जातो. श्रद्धा, कलह, मानवीमूल्ये यांचे कधी स्पष्ट तर कधी धूसर असे दर्शन घडविणारे ४० प्रसंगांनी ग्रथित केलेला हा ललितलेख संग्रह आहे.




**पुस्तक : प्रतिसाद**

*लेखक :* टी. एन. परदेशी

*प्रकाशक :* अनघा प्रकाशन, ठाणे

डिसे. २०१२, *पृष्ठे :* १९४

**गुरुवर्य 'वा.ल.' – संपादक डॉ. शिल्पा तेंडुलकर**




मराठीतील ज्येष्ठ समीक्षक यांच्या पी.एचडी.च्या विद्यार्थ्यांनी 'वा.ल.'च्या जन्मशताब्दीनिमित्त प्रकाशित केलेल्या या ग्रंथात त्यांच्या समीक्षा-जीवनाचा प्रत्यय देणारे शेहेचाळीस लेख आहेत. सुधीर रसाळ, विजया राजाध्यक्ष, द. मा. मिरासदार, श्री. पु. भागवत, रामदास भटकळ, ज्ञानेश्वर नाडकर्णी, डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, सरोजिनी वैद्य प्रभृती दिग्गजांचे लेख त्या ग्रंथात आहेत. यांची खरे तर स्वतंत्र समीक्षा झाली पाहिजे. डॉ. शिल्पा तेंडुलकरांनी संपादित केलेल्या या ग्रंथाचे मराठीतील संपादित ग्रंथ प्रकाशनात मोलाची भर घातली आहे.

**गुरुवर्य 'वा.ल.'**

**संपादक :** डॉ. शिल्पा तेंडुलकर

चांदणवेल प्रकाशन, अंबरनाथ पूर्व (जि. ठाणे)

एप्रिल २०१२, *पृष्ठे :* ३९८,

◇◇◇

**नंदा सुर्वे**
१४ सुजीत कॉम्प्लेक्स
६०/७/A, वडगाव बुद्रुक
हायवे ब्रीजजवळ, सिंहगड रोड,
पुणे ४११०४१
फोन : २४३९०२७०, ९४२३५३३२४०

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
## (१ सप्टेंबर २०१३ ते ३० नोव्हेंबर २०१३)

### – पुणे शहर –

**१) दि. २६ ऑगस्ट २०१३ : नवकोरं :** 'हलचल' या श्री. ह. ल. निपुणगे यांच्या आत्मकथनपर पुस्तकावर चर्चा झाली. श्री. शंकर सारडा अध्यक्षस्थानी होते. प्रा. विश्वास वसेकर, प्रभा सोनवणे, व ह. ल. निपुणगे यांनी या चर्चेत भाग घेतला.

**२) दि. ३१ ऑगस्ट २०१३ : डॉ. नरेंद्र दाभोळकर विचारस्मरण सभा :** या सभेच्या अध्यक्षस्थानी डॉ. प्र. चिं. शेजवलकर होते. प्रा. रा. ग. जाधव, भाई वैद्य, विद्या बाळ, डॉ. अरुणा ढेरे, सुभाष वारे, मकरंद साठे, अतुल पेठे, संतोष शेणई, संजय भास्कर जोशी, विनोद शिरसाठ, सुरेश देशमुख इत्यादी वक्त्यांनी आपले विचार प्रकट केले.

**३) दि. २७ सप्टेंबर २०१३ : कॉफी क्लब :** रविराज गंधे निर्माता– अमृतवेल यांच्याशी 'दूरचित्रवाणी वरील साहित्य विश्व' या विषयावर गप्पा झाल्या. संजय भुस्कुटे यांनी श्री. गंधे यांच्याशी संवाद साधला.

**४) दि. ३० सप्टेंबर २०१३ : श्रद्धांजली सभा :** मसाप, पुणे व मराठी प्रकाशक परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने, मसापचे माजी कार्याध्यक्ष डॉ. भ. वि. गोखले, माजी कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी, ज्येष्ठ नाटककार साहित्यिक शं. ना. नवरे आणि संस्कृततज्ज्ञ कृष्ण अर्जुनवाडकर यांना श्रद्धांजली वाहणारी सभा झाली. दीपक करंदीकर, सुनील महाजन, देवयानी अभ्यंकर, कै. रत्नाकर कुलकर्णी यांची नात तान्या गोगटे, प्रा. आहिवळे, अनिल कुलकर्णी, सुहास भोमे, ॲड. प्रमोद आडकर, ह. ल. निपुणगे, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. न. म. जोशी, अरुण जाखडे, डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. माधवी वैद्य यांनी श्रद्धांजली वाहणारी भाषणे केली.

**५) दि. ९ ऑक्टोबर २०१३ : कै. बाबूराव शिरोळे बालसाहित्य पुरस्कार :** मुलांसाठी, आजी-आजोबांच्या गोष्टी अंतर्गत कार्यशाळेचे आयोजन करण्यात आले होते मार्गदर्शक म्हणून बालसाहित्यकार राजीव तांबे उपस्थित होते. याचप्रसंगी त्यांना कै. बाबूराव शिरोळे बालसाहित्य पुरस्कार प्रदान करण्यात आला. हा कार्यक्रम दुपारी १ वाजता जिजामाता हायस्कूल, शुक्रवार पेठ, पुणे या मुलींच्या शाळेत झाला.

**६) दि. १५ ऑक्टोबर २०१३ : प. पू. परमहंस स्वामी स्वरूपानंद (पावस) स्मृतिव्याख्यान :** प्राचार्य रामदास डांगे यांचे 'ज्ञानेश्वरी-एक पाऊल पुढे' या विषयावर आनंदमंगल कार्यालयातील सभागृहात झाले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले व डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले. याप्रसंगी वसंतराव देसाई, मधुकाका पटवर्धन, राजाभाऊ दिवाण हे उपस्थित होते. प्रा. डांगे यांच्या हस्ते राजाभाऊ दिवाण यांचा विशेष सत्कार करण्यात आला. त्याचप्रमाणे मंगला पुरंदरे यांचासुद्धा सत्कार करण्यात आला. उपस्थितांसाठी चहापानाची व्यवस्था होती.



अनुक्रमणिका

**७) दि. १७ ऑक्टोबर २०१३ : हास्य कविसंमेलन :** पुणे बुक फेअरचे ग्रंथ विक्री प्रदर्शन दरवर्षी गणेश कला क्रिडा केंद्रात भरविले जाते. त्या अंतर्गत परिषदेच्या पटवर्धन सभागृहात साहित्यिक कार्यक्रम पुणे बुक फेअर व म. सा. प. यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित केले जातात. यंदाच्या हास्य कविसंमेलनात बंडा जोशी, संदीप अवचट, घनश्याम धेण्डे, उज्ज्वला कुलकर्णी यांनी आपल्या बहारदार विनोदी कवितांचे सादरीकरण केले. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन बंडा जोशी व कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. डॉ. माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे, डॉ. कल्याणी दिवेकर, नंदा सुर्वे उपस्थित होते. त्याचप्रमाणे पुणे बुक फेअरचे अरुण भावे, राजन हे उपस्थित होते.

**८) दि. १८ ऑक्टोबर २०१३ : कविसंमेलन :** पुणे बुक फेअर व म.सा.प. यांच्या संयुक्त विद्यामाने कोजागिरी निमित्त भावकवितांचे सादरीकरण करणारे निमंत्रित कवींचे कविसंमेलन आयोजित केले होते. स्वाती सामक, भारती पांडे, ज्योत्स्ना चांदगुडे, हेमंत जोगळेकर, मनोहर सोनवणे व जयंत भिडे या निमंत्रीत कवींनी आपल्या रचना सादर केल्या. जयंत भिडे यांनी कवीसंमेलनाचे सूत्रसंचालन व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

**९) दि. १९ ऑक्टोबर २०१३ :** पुणे बुक फेअर व म.सा.परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने 'मराठी माध्यमांच्या शाळांची पीछेहाट काझाली? कारणे व उपाय' या विषयावर चर्चात्मक कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. ज्ञानेश्वर भणगे, शिक्षक आमदार भगवानराव साळुंखे, डॉ. नेहा जोशी-एस.एनडीटी कन्याशाळा, श्री. वा. कुलकर्णी मुख्याध्यापक म.ए.सो. हायस्कूल आणि काही शिक्षकांचा सहभाग या चर्चासत्रात होता.

**१०) दि. १५ नोव्हेंबर २०१३ : योगिनी जोगळेकर स्मृतिदिन : निमंत्रितांचे कवी संमेलन :** उर्मिला भांवुरकर यांनी शब्द व स्वर रचना योगिनी जोगळेकरांची असलेले 'शारदास्तवन' प्रारंभी सादर केले. प्रास्ताविक कार्याध्यक्षक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. निमंत्रित कवींचे व सुधन्वा जोगळेकर यांचे स्वागत व सत्कार प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. श्री. सुधन्वा जोगळेकर यांनी मनोगत व्यक्त केले. उद्धव कानडे यांनी निमंत्रितांच्या कविसंमेलनाचे सूत्रसंचालन व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. नीलिमा गुंडी, दीपक करंदीकर, अंजली कुलकर्णी, प्रभा सोनवणे, शरद उमराणी व उद्धव कानडे यांनी कविता सादर केल्या.

**११) दि. १८ नोव्हेंबर २०१३ : म.म.कै.दत्तो वामन पोतदार स्मृतिपुरस्कार सोहळा :** 'युगद्रष्टा महाराजा सयाजीराव गायकवाड' या कादंबरीला व ग्रंथाचे लेखक श्री. बाबा भांड यांना डॉ. राजादीक्षित यांच्या हस्ते द. वा. पोतदार स्मृतिपुरस्कार प्रदान करण्यात आला. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी सूत्र संचालन केले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी स्वागत केले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. प्रा. डॉ. गणेश राऊत व प्रा. रुपाली शिंदे यांनी परीक्षकाचे काम पाहिले. प्रा. रुपाली शिंदे, बाबा भांड, व अध्यक्ष प्रा. राजा दीक्षित यांनी आपले विचार मांडले.

**१२) दि. २८ नोव्हेंबर २०१३ : आहिताग्नी शं. रा. राजवाडे स्मृतिदिनव्याख्यान :** डॉ. सुचेता परांजपे यांचे 'वेदवाङ्मयात दिसणाऱ्या नृत्यगायनादि

कला' या विषयावर व्याख्यान झाले. कै. राजवाडे कन्या शकुंतला आठवले यांच्या कुटुंबियांपैकी शैलामुकुंद अनिरुद्ध राजवाडे हे आवर्जून उपस्थित होते. स्वागत व प्रास्तविक प्रकाश पायगुडे यांनी केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी डॉ. सुचेता परांजपे यांचा परिचय करून दिला. दीपक करंदीकर यांनी सूत्र संचालन केले व आभार मानले.

**१३) दि. २९ नोव्हेंबर २०१३ : माधव जूलियन स्मृतिदिन :** रमण रणदिवे आणि त्यांचे सहकारी अनुक्रमे राजेश दातार, अपर्णा पणशीकर, प्रमोद जांभेकर, निलेश रणदिवे, निखिल रणदिवे यांनी रमण रणदिव्यांच्या गीत गझल गायनाचा 'अक्षर चांदणं' हा बहारदार कार्यक्रम सादर केला. प्रारंभी कार्यवाह दीपक करंदीकर यांनी माधव ज्यूलियन यांच्या एका ग़झलेचे प्रभावी वाचन केले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी स्वागत व प्रास्तविक केले व कलाकरांचे सत्कार केले. सूत्रसंचालन व आभारप्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले. 'अक्षर चांदणे' या कार्यक्रमाचे बहारदार सूत्रसंचालन स्वत: रमण रणदिवे यांनी केले. या कार्यक्रमास गझलरसिकांची लक्षणीय उपस्थिती होती.

**१४) दि. २० नोव्हेंबर २०१३ : कमोडोर कै. मधुकर केशव लेले स्मृतिव्याख्यान :** डॉ. वि. वि. घाणेकर यांचे 'महात्मा गांधी आणि डॉ. आंबेडकर यांचे विचार साधर्म्य' या विषयावर व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्तविक प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. वक्त्यांचा परिचय व सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी करून दिला. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.





अनुक्रमणिका



## — म.सा.प. धुळे-सोलापूर शाखा —

**दि. ६ ऑगस्ट २०१३ : कार्यकारिणी बैठक :** कार्याध्यक्ष श्री. सुधाकर जोशी यांनी राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागी सायली अमोल जोशी यांची निवड करण्यात आली. तसेच इतर पाच कार्यकारिणी सदस्यांनी राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागी रुपश्री येवलेकर, मधुकर वीर, रोहिणी कुलकर्णी, सचिन चौधरी, प्रीती मिरजगावकर यांची निवड करण्यात आली.

**दि. २४/८/२०१३ : नव्या-जुन्या गीतांचा कार्यक्रम :** गौतमी जितुरी, नागेश पवार या नवोदित कलाकारांनी हा कार्यक्रम सादर केला. डॉ. वासुदेव रायते, प्रा. ए. डी. जोशी, रोहिणी तळवळकर, गिरीश दुनाखे, प्रशांत जोशी, श्रीकांत कुलकर्णी, सचिन चौधरी व पद्माकर कुलकर्णी उपस्थित होते. याचदिवशी शाखा व अनुबंध प्रकाशन, पुणे यांचे संयुक्त विद्यमाने 'दलितमित्र श्री. भीमराव जाधव गुरुजी यांच्या 'कथा काटेरी कुंपणाची' या आत्मचरित्राचे प्रकाशन मा. श्री. उल्हासदादा पवार यांच्या अध्यक्षतेखाली झाले. डॉ. चंद्रकांत पुरी यांचे शुभहस्ते झाले. श्री. जाधव यांच्या जीवनावरील लघुपटाचे प्रकाशन डॉ. वासुदेव रायते यांचे शुभहस्ते झाले.

**दि. २५ ऑगस्ट २०१३ :** मंगल अशोक कुदळे, माळीनगर यांच्या 'अशी पाखरे येती' या कथासंग्रहास बाबूराव वाघमोडे स्मृती कथा पुरस्कार व स्मिता प्रमोद पाटील, मोहोळ यांच्या 'समिधा' या कवितासंग्रहास अंजनीबाई वाघमोडे स्मृतिकाव्य पुरस्कार डॉ. महेंद्र कदम यांच्या शुभहस्ते व योगीराज वाघमारे यांच्या अध्यक्षतेखाली प्रदान करण्यात आले. सूत्रसंचालन मारुती कटक धोंड यांनी केले. आभारप्रदर्शन अभिलाषा नरोटे यांनी केले.

**दि. ३० सप्टेंबर २०१३ : जुळे सोलापूर शाखेचा द्वितीय वर्धापनदिन :** डॉ. स्वर्णलता भिशीकर यांना पहिला स्व. दत्ता हलसगीकर श्रेष्ठ साहित्यिक पुरस्कार विवेकजी घळसासी यांच्या शुभहस्ते प्रदान करण्यात आला. सूत्रसंचालन प्रशांत जोशी व आभारप्रदर्शन सायली जोशी यांनी केले. मानपत्राचे वाचन अनिरुद्ध जोशी यांनी केले. मानपत्राचे लेखन नारायणकाका कुलकर्णी यांनी केले.

**दि. १६/१०/२०१३ : नवनिर्वाचित अध्यक्ष कवीश्री फ. मुं. शिंदे यांचा सत्कार :** शाखेच्या सर्व कार्यकारिणी सदस्यांनी व सोलापूरातील मान्यवरांनी, वृत्तपत्रातून दूरध्वनीवरून श्री. शिंदे यांना शुभेच्छा देऊन अभिनंदन केले.

**दि. २० ऑक्टोबर २०१३ :** 'डॉ. अनिल अवचटांचे गप्पांगण' हा कार्यक्रम झाला. डॉ. अवचटांशी सीमंतिनी चाफळकर यांनी संवाद साधला. डॉ. वासुदेव रायते यांनी प्रास्ताविक करून आभार मानले.

**दि. २ नोव्हेंबर २०१३ : दीपावली विशेष :** व्यंकटेश संगीत विद्यालय व शाखा यांच्या विद्यमाने कपिल जाधव, बलभीम आणि सोमनाथ जाधव यांचे सुंद्रीवादन, श्रेयस कुस्तुरकर भरतेश तडवळकर गुरुराज आसमेलकर यांचे तबलावादन अंधविद्यार्थिनी कृत्तिका जंगीनमठ हिचे बासरीवादन असे कार्यक्रम दीपावलीनिमित्त आयोजित केले गेले. सूत्रसंचालन सचिन चौधरी व आभार संदीप कुलकर्णी यांनी

मानले. उद्घाटन डॉ. माधवी रायते, डॉ. वासुदेव रायते, आयुक्त चंद्रकांत गुडेवार यांनी दीपप्रज्वलन करून केले.

दि. ३ नोव्हेंबर रोजी श्री. अजित कडकडे यांचा 'स्वरपहाट' हा भक्तिगीतांचा कार्यक्रम झाला. सोलापूरातील अनेक मान्यवर पहाटेच्या या कार्यक्रमास आवर्जून उपस्थित होते.

**दि. १७ नोव्हेंबर २०१३ :** स्व. श्रीनिवास रायते गुरुजी बालसाहित्यिक पहिला पुरस्कार गोविंद गोडबोले, मीरज फ. मुं. शिंदे यांच्या हस्ते देण्यात आला. श्री. फ. मुं. शिंदे यांचा संमेलनाध्यक्ष म्हणून अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांचे हस्ते सन्मान करण्यात आला. आंतरशालेय हस्तलिखित स्पर्धेचा बक्षीस समारंभ गोविंद गोडबोले यांच्या हस्ते करण्यात आला. प्रशांत जोशी यांनी सूत्रसंचालन केले. आभारप्रदर्शन नारायण कुलकर्णी यांनी केले.

**दि. २२/११/२०१३ :** राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा-२०१३ शाखेच्या वतीने आयोजित केली होती.

**दि. ८ डिसेंबर २०१३ : कविसंमेलन :** कै. दिवाकर दुनाखे स्मृतिप्रीत्यर्थ कविसंमेलन झाले. प्रसाद दुनाखे यांनी मनोगत व्यक्त केले. लक्ष्मीनारायण बोल्ली, डॉ. अजित नदाफ, माधव पवार, वसुधा दुनाखे यांनी दीपप्रज्वलन व सरस्वतीपूजन केले. राजेंद्र भोसले, देवेंद्र औटी, बदीऊज्जमा बिराजदार, पुरुषोत्तम नगरकर, प्रा. कुलकर्णी, शरद पाटील, मारुती कटकधोंड, निर्मला मठपती, वसुधा दुनाखे, गिरीश दुनाखे, शांता क्षीरसागर, आशा पाटील, लता आध्यापक रेणुका बुधाराम, या कवींचा कविसंमेलनात सहभाग होता. सूत्रसंचालन प्रशांत जोशी व माधव पवार यांनी केले. आभार गिरीश दुनाखे यांनी मानले.

जुळे सोलापूर शाखा कार्यवृत्त नोंद : कार्यवाह गिरीश दुनाखे.

---

## – म.सा.प. सोलापूर शाखा –

**दि. ६ ऑक्टोबर २०१३ :** सोलापूर शहर शाखेचा ७१ वा वर्धापनदिन सोहळा : श्री. श्याम भुर्के व म.सा.प पुणे केंद्राचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. स्नेहमेळाव्यास अनेकांची लक्षणीय उपस्थित होती. ज्येष्ठ साहित्यिकांचा सन्मान करण्यात आला. श्री. भुर्के यांचे 'मला उमजलेले साहित्यिक-सांस्कृतिक सोलापूर' या विषयावर व्याख्यान झाले व 'सोलापूरनगरीचा ऐतिहासिक वारसा' या विषयावर सीमंतिनी चाफळकर यांचे हक्क दृक-श्राव्य चित्रफितीसह व्याख्यान झाले.

---

## – म.सा.प. फलटण शाखा –

**दि. २६ नोव्हेंबर २०१३ : स्व. यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलन :** हे दिवसभराचे संमेलन 'काव्य' विषयाला वाहिलेले होते. श्री. विजय कोलते, नारायण सुमंत, अरुण गोडबोले, यांची विशेष उपस्थिती होती. लता ऐवाळे, रमझान मुल्ला, बंडा जोशी, दशरथ यादव, हणमंत चांदगुडे, तुकाराम पाटील, गोकुळ पवार, कल्पना दुधाळ, बबलू वडार, आनंद साळवे, जयपाल पाटील, मारुती कटकधोंड या कवींचे संमेलन झाले. राजा मंगसुळीकर अध्यक्षस्थानी होते.

## – म.सा.प. धुळे जिल्हा शाखा –

**दि. २८ जुलै २०१३ :** गरुड वाचनालय यांच्या संयुक्त विद्यमाने स्व. श्रीमंत पद्माराजे कदमबांडे, सुलभा बावीस्कर, विद्याधर वैद्य यांच्या स्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन झाले. एकूण २६ कवींनी सहभाग घेतला. अध्यक्षस्थान शिवाजीराव साळुंके यांनी भुषविले. श्री. चौधरी प्रमुख अतिथी होते. कार्याध्यक्ष मोहन मोरे यांनी प्रास्ताविक केले. सुमन महाले यांनी आभार मानले. सूत्रसंचालन प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे यांनी केले.

**दि. २० जानेवारी २०१३ :** दलितमित्र प्रा. सी. आय. मोरे स्मृतिप्रीत्यर्थ : प्रा. फुला बागुल (शिरपूर) यांचे 'समाज आणि मूल्य शिक्षण' यां विषयावर व्याख्यान झाले. भरत काळू जगताप यांना प्रा. अनिल सोनार यांच्या हस्ते 'जाणीव जागृती पुरस्कार' देण्यात आला. शालेय विद्यार्थ्यांची 'रंगभरण' स्पर्धा घेतली गेली. त्यात ५०० विद्यार्थ्यांचा सहभाग होता. प्रास्ताविक कार्याध्यक्ष मोहन मोरे व आभारप्रदर्शन कार्यवाह सविता वहाळकर यांनी केले. सूत्रसंचालन कार्यवाह प्रा.डॉ. सुरेंद्र मोरे व कार्याध्यक्ष मोहन मोरे यांनी केले.

**दि. १७ ऑगस्ट २०१३ :** भाऊ देशपांडे, पद्माराजे कदमबांडे, सुलभा बावीस्कर व विद्याधर वैद्य व नगराज बोरसे यांचे स्मृतिदिन साजरे करण्यात आले. 'कविता पावसाची' हा कार्यक्रम झाला. एकूण २५ कवींनी कविता सादर केल्या. त्यात सुमन महाले, विश्वनाथ मोरणकर, सुभाष आहिरे, मंगला रोकडे यांनी कविता सादर केल्या. मोहन मोरे यांनी प्रास्ताविक केले. स्वागत प्रा. सविता बहाळकर यांनी केले. प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे यांनी सूत्रसंचालन व आभारप्रदर्शन केले.

---

## – म.सा.प. चाळीसगाव शाखा –

**दि. १४ ऑगस्ट २०१३ :** श्री. किशोर पाठक यांचे 'जगणे आणि साहित्य' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. आबासाहेब तानसेन जगताप अध्यक्षस्थानी होते.

---

## – म.सा.प. अहमदनगर शाखा –

१) साहित्य संमेलन, सासवडचे अध्यक्ष म्हणून निवड झाल्याबद्दल कवि फ. मुं. शिंदे यांचा सत्कार आयोजित केला.

२) आकाशवाणी अहमदनगर आणि म.सा.प. नगर शाखा संयुक्त विद्यमाने कवि फ. मुं. शिंदे यांची मुलाखत हास्यसम्राट कळमकर यांनी घेतली.

३) शुद्धलेखन स्पर्धा– शालेय स्तरावर आयोजित केल्या.

४) बालकवि ठोंबरे यांचा नीलफलक लावण्यात पुढाकार.

५) शताब्दीपूर्ती अंकाचे स्वागत करण्यासाठी म.सा.प. नगर शाखा पुण्याला हजर राहिली व संपादकांचा सत्कार केला.

**–चंद्रकान्त पालवे, कार्याध्यक्ष, म.सा.प.नगर**

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.




## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा शताब्दीपूर्ती समारंभ

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला १२ ऑगस्ट २०१२ रोजी शंभर वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषदेने १० ऑक्टोबर २०१३ रोजी शताब्दीपूर्ती समारंभ आयोजित केला. समारंभाचे अध्यक्ष म्हणून ८३ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रसिद्ध समीक्षक मा. डॉ. द. भि. कुलकर्णी हे होते. या समारंभासाठी शताब्दीपूर्ती साहित्य-पत्रिकेच्या विशेषांकाचे प्रकाशन करण्यासाठी माजी खासदार आणि मुळा सहकारी साखर कारखाना, सोनई (जि. अहमदनगर) चे अध्यक्ष, साहित्यिक मा. यशवंतरावजी गडाख-पाटील आले होते. समारंभास प्रमुख उपस्थिती मान. ॲड. भास्कररावजी आव्हाडसाहेब, अध्यक्ष म.सा.प.चे विश्वस्त मंडळ, म.सा.प.चे विश्वस्त, आमदार उल्हासदादा पवार हे उपस्थित होते.

समारंभाचे प्रास्ताविक म.सा.प.चे कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले, तर पाहुण्यांचा परिचय आणि स्वागत साहित्यपत्रिकेचे संपादक डॉ. सु.प्र.कुलकर्णी यांनी केले. विश्वस्तांचा परिचय प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी करून दिला.

'ॐ नमोजी आद्या' या गणेशस्तवनाचे गायन सौ. मृदुला अडावदकर यांनी केल्यानंतर शताब्दीपूर्ती अंकाचे प्रकाशन मान यशवंतरावजी गडाख-पाटील यांनी केले. प्रकाशनानिमित्त त्यांनी केलेल्या भाषणात त्यांनी भाषेने माणसांची मने कशी जुळली जातात त्याचा भाषेच्या प्रारंभिक अवस्थेपासून आढावा घेतला. शताब्दीपूर्ती अंकाच्या प्रकाशनानिमित्त त्यांनी वर्षभरातील उत्कृष्ट समीक्षालेखास पारितोषिक जाहीर करून त्यासाठी रु. एक लक्ष मात्रची देणगी संपादक डॉ. कुलकर्णी यांचेकडे धनादेशाने दिली.

आपल्या अध्यक्षीय भाषणात समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी शताब्दी पत्रिकेतील १९१२ ते १९४३ मधील प्रकाशित झालेल्या लेखांच्या आधारे अंकाची समीक्षा केली. या विशेषांकातील काशीबाई कानिटकर यांनी लिहिलेल्या कै. ह. ना. आपटे यांच्या चरित्रलेखाची विशेष समीक्षा केली. स्त्रियांचे लिखाण, स्त्री-पुरुष मैत्री, प्रबोधनयुगाची मराठी भाषा आणि साहित्य यांची मनोवेधक शब्दांत आस्वादक समीक्षा केली. उपस्थित प्रेक्षकांनी हा आस्वाद-आनंद भरभरून स्वीकारला.

शताब्दीपूर्तीनिमित्त साहित्यपत्रिकेचे माजी संपादक शंकर सारडा, ह. ल. निपुणगे तसेच माजी प्रमुख कार्यवाह आणि प्रकाशक राजा फडणीस मुद्रक - स्मिता ऑफसेटचे संचालक श्री. हेमंत जोशी यांचाही सत्कार करण्यात आला.

प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आपल्या सूत्रसंचालनाने कार्यक्रमास शोभा आणली. सौ. मृदुला अडावदकर यांच्या पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

### निवेदन

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या या अंकात इ.स. १९१२ ते १९४३ पर्यंतच्या निवडक लेखांना पुनर्प्रसिद्धी दिली असून, त्याआधारे पत्रिकेच्या प्रारंभिक साहित्यरूपाचे आणि प्रबोधनाच्या पाऊलखुणांचे सिंहावलोकन केलेले आहे. हा संग्राह्य अंक रु. १००/- देणगी देऊन उपलब्ध होईल.



अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly :October- December 2013
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*






प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.





